आंतर भारतीय पुस्तकमाला

# पात्तुम्माची शेळी
आणि
# बालमैत्रीण


वैकम् मुहम्मद बषीर

अनुवादक
उमाकान्त ठोमरे





नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

पहिली आवृत्ती : 1973 (शके 1895)
चौथी आवृत्ती : 1990 (शके 1912)

Original Title : Pathummayude Adu & Balyakala Sakhi (Malayalam)
Marathi Translation : Pattummachi Sheli Ani Balmaitrin
रू. 10.00
संचालक : नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5, ग्रीन पार्क,
नवी दिल्ली-110 016 द्वारा प्रकाशित

# परिचय

मल्याळममध्ये कादंबरीलेखनास प्रारंभ झाला तेव्हापासून तिने केलेल्या वाट-चालीस अद्याप शंभर वर्षे पुरी व्हावयाची आहेत. सन १८८७ मध्ये अप्पू नेटुंङाडी यांनी 'कुंदलता' नामक कादंबरी लिहिली. मल्याळम भाषेत लिहिली गेलेली ही पहिली कादंबरी. विद्वानांच्या मतानुसार पाश्चात्त्य देशांत—युरोपमध्ये—शेक्स्पियरच्या काळात कादंबरीलेखन प्रचारात होते. परंतु मल्याळम भाषेत हा साहित्य-प्रकार त्यानंतर बऱ्याच काळाने आविष्कृत झाला. ज्या काळात साहित्य-आस्वादनाचा अर्थ फक्त पद्य-काव्याचा आस्वाद घेणे येवढ्यापुरताच मर्यादित होता, त्या काळात ही 'कुंदलता' कादंबरी प्रसिद्ध झाली. 'कुंदलता'ने साहित्यात रस असणाऱ्या वाचक-वर्गास एक नवा साहित्य-प्रकार उपलब्ध करून दिला. असे असूनही कादंबरी एक साहित्यप्रकार, या नात्याने कादंबरीचा खरा परिचय साहित्यप्रेमी मंडळींना घडला तो 'इंदुलेखा'च्या प्रकाशनानंतरच. ओ. चंतू मेनवन यांची ही साहित्यकृती भाव-संकुलता त्याचप्रमाणे रचना-सौष्ठव या कलागुणांनी अलंकृत अशी पहिली मलयाळम कादंबरी आहे असे म्हणावे लागेल. न्यायाधीशासारखे उच्च अधिकारपद भूष-विणाऱ्या चंतू मेनवन यांना इंग्रजी साहित्याशी संपर्क राखणे सहज शक्य गोष्ट होती. 'इंदुलेखा'मध्ये आपल्याला पूर्ण परिचित असलेल्या समाजजीवनाचे, सामाजिक स्थितीचे त्यांनी चित्रण केले आहे. मातृसत्ताक पद्धतीचा ऱ्हास आणि इंग्रजी शिक्षण प्राप्त झालेल्या नव्या पिढीला जाणवलेला स्वातंत्र्याचा अर्थ, ह्या दोन गोष्टी या कादंबरीच्या भाव-शृंखलेतील मुख्य दुवे आहेत.

'इंदुलेखा' नंतर मल्याळममध्ये लिहिली गेलेली दुसरी प्रमुख कादंबरी सी. व्ही. रामन पिल्ला यांची 'मार्तंडवर्मा' कादंबरी होय. 'इंदुलेखा'हून सर्वस्वी भिन्न स्वरूपाची ही कादंबरी आहे. भावाविष्कार आणि रचनास्वरूप या बाबतीत या कादंबरीने सर वॉल्टर स्कॉट यांच्या 'आयव्हॅनो'लाही मागे टाकले आहे. स्वातंत्र्यपूर्व काळापर्यंत दक्षिण केरळातील जे संस्थान 'तिरवितांकूर' या नावाने प्रसिद्ध होते त्या राज्याचा राष्ट्रीय इतिहास या कादंबरीचा प्रतिपाद्य विषय आहे. सन १९११ मध्ये याच लेखनपरंपरेत चपखल बसणारी 'धर्मराज' नावाची पौराणिक कादंबरी प्रस्तुत लेखकाच्या लेखणीने शब्दबद्ध केली. ह्या दोन

साहित्यकृतींच्या आधारे रामन पिल्ला यांनी स्वत:ला चंतू मेनवनच्या जोडीचे स्थान साहित्यात प्राप्त करून घेतले.

यानंतर पुढे जवळजवळ वीस-पंचवीस वर्षेपर्यंत मल्याळममधील कादंबरीक्षेत्रात कसली काही हालचाल झाल्याचे दिसून येत नाही. मध्यंतरीच्या काळात लक्षात राहण्याजोगी फक्त एकच साहित्यकृती प्रकाशित झाली. ती म्हणजे भवत्रातन नंपूतिरी यांनी लिहिलेली 'अप्फंटे मकळ्' हा जणू मल्याळम कादंबरीच्या भावी उन्नतीच्या गर्भावस्थेचा काळ होता.

चंतू मेनवनच्या काळापर्यंत मल्याळम साहित्यिकांचा पाश्चात्य साहित्याशी कसलाही काही लागाबांधा वा संबंध नव्हता. परंतु या शतकाच्या चौथ्या दशकात ही स्थिती पार बदलली. इंग्रजी आणि अन्य पाश्चात्य भाषांतील अनेक श्रेष्ठ ग्रंथांचे अनुवाद मल्याळममध्ये झाले. लेखकांचे इंग्रजी भाषेचे ज्ञान आणि जाणकारीही वाढीला लागली. यामुळे कादंबरीलेखनासंबंधीच्या त्यांच्या कल्पना आणि तद्विषयक दृष्टिकोन यांमध्ये विशेष सुधारणा होण्यास सुरुवात झाली. नवसाहित्याचा आविष्कार...आधुनिक साहित्याची निर्मिती याच काळाची देणगी आहे. रशियन क्रांती आणि समाजवादाचा उदय यांनी एतद्विषयक केरळीय उपासकांना चाकोरी-बाहेर काढले, मुक्त केले – स्वतंत्र केले. समाजवादी तत्त्वज्ञानातून प्राप्त झालेल्या ओजस्वी प्रेरणांमुळे आणि पाश्चात्य कादंबऱ्यांचे अध्ययन, अभ्यास आणि परिशीलन यांयोगे आलेल्या कलामूल्यांच्या डोळस जाणिवेने मल्याळम कादंबरीच्या सुवर्ण युगाची मुहूर्तमेढच रोवली गेली.

'तकषी'[१], केशवदेव त्याचप्रमाणे बषीर हे या युगाचे सर्वश्रेष्ठ कादंबरीकार होत. मल्याळम कादंबरी-विश्वाचे हे ब्रम्हा-विष्णु-महेश म्हणजेच त्रिमूर्ती मानले जातात. 'उरूब' त्याचप्रमाणे 'पोट्टुक्काट्टू' या दोघांचेही स्थान या त्रिमूर्तींच्याच तोलामोलाचे समजले जाते. यांच्या विभिन्नतेचा आधार कला आणि मनोभाव हे दोन्हीही आहेत. 'तकषी'च्या कादंबऱ्यांत एका युगाचे रक्त आणि सत्त्व आहे, केशवदेवांच्या साहित्यकृतीत धार्मिक संतापाचा अग्नि प्रखर आहे, बषीर यांच्या कथाकादंबऱ्यांतून ज्ञानाचा प्रकाश प्रसारित होत असतो, तर 'पोट्टुक्काट्टू'ची लेखणी अंतर्मनाच्या हृदयांतरी वास करणाऱ्या भावभावनांचे चित्र शब्द-बद्ध करते– शब्दशिल्प कोरते.

---

१. 'ष' चा उच्चार आपल्या मराठी 'क' शी जुळता मिळता होतो, अथवा मृदु 'इ' सारखाही केला तरी चालते.

आधुनिक मल्याळम कादंबरीचे जनक आहेत 'तकषी' शिवशंकर पिल्ला. समाजवादी किंवा वास्तववादाचे प्रणेते म्हणून संबोधल्या जाणाऱ्या ह्या कादंबरीकाराच्या साहित्यकृतीतून नव्या युगाच्या हृदयस्पंदनाचे पडसाद वाचकांच्या कानाशी रेंगाळत राहातात. लेखनाधार झालेल्या काळाचे यथार्थ जिवंत चित्रण आणि निर्मितिकौशल्य या गुणविशेषांचे दर्शन जेवढे आणि ज्या प्रमाणात यांच्या कादंबऱ्यांतून प्रत्ययास येते तेवढे अन्य कोणाच्या साहित्यकृतीतून येत नाही. यांची 'तोट्टियुटे मकन्' ही सुप्रसिद्ध कादंबरी प्रस्थापित सदाचारव्यवस्थेला एक आव्हानच आहे. याच कादंबरीत यथार्थवादाच्या लक्ष्यार्थ-शैलीचा प्रथमतःच उपयोग केला गेला आहे. 'रंडी टंङ्षी' (दोन शेर) या त्यांच्या कादंबरीला 'चैम्मीन' इतकी कीर्ती आणि प्रसिद्धी लाभली नसली तरीही 'तकषी'च्या लेखनशैलीची, साहित्यनिर्मितीच्या सामर्थ्याची ती पूर्ण प्रातिनिधिक कादंबरी आहे हे विसरून चालणार नाही. या कादंबरीत 'तकषी'च्या एकूण श्रद्धा, निष्ठा आणि विचार शब्दाशब्दांतून बोलक्या झाल्या आहेत. शब्दांना चैतन्याचा कंठ फुटल्यागत झाले आहे. केरळीयांच्या अंतर्यामीचे क्रांतिस्फुल्लिंग फुलविण्यात क्रांति-भावना जागृत करण्यात या कादंबरीचा वाटा, या कादंबरीचे श्रेय काही थोडेथोडके नाही. 'चैम्मीन' कोळी समाजाची कथा आहे. कादंबरीच्या अखेरीस एकमेकांच्या बहुपाशांत बद्ध झालेली परीक्कुट्टी आणि करुत्तम्मा यांची कलेवरे लाटांवर हेलकावे खात सागरकिनाऱ्याकडे सरकू लागतात आणि त्यायोगे निर्माण झालेली नाट्यपूर्णता वाढत वाढत अशा काही उत्कटतेला पोहोचते की तसले नाटक तोपर्यंतच्या कुठल्याही मल्याळम कादंबरीत प्रत्ययाला आले नसल्याचे जाणवून जाते. 'चैम्मीन'मध्ये 'तकषी' समुद्र आणि मानवी मन यांच्यामध्ये प्रत्ययास येणाऱ्या सारख्याच गहन गूढतेद्वारे सुसंवाद निर्माण करतात.

'एणिप्पटिकळ्' ही एक प्रचंड कादंबरी आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर केरळाने पुरस्कारलेला, अंगीकृत केलेल्या राष्ट्रीय त्याचप्रमाणे सामुदायिक जीवनाचा आचारमार्ग स्पष्टपणे चित्रित केल्याचे दिसून येते.

केशवदेवांच्या कादंबऱ्यांचा आत्मा, स्थायीभाव, विचार-गाभा क्रांति-जागृतीचाच आहे. 'तकषी'च्या क्रांति-उद्बोधाचा आधार एक विशिष्ट तत्त्वप्रणाली—मार्क्सवाद आहे. परंतु केशवदेवांचा क्रांति-उद्बोध नैसर्गिक आहे. त्यांच्या कथाकादंबऱ्यांतली पात्रे अनीती, अनाचार आणि अन्याय यांविरुद्ध गर्जून उठतात. 'ओडयिल् निन्नू' त्यांची सर्वोत्कृष्ट साहित्यकृती मानली जाते. तिचा नायक पप्पू त्यागाचे मूर्तिमंत प्रतीक वाटतो. त्याच्या विश्वाच्या द्वारे लेखक जणू मानवतेच्या

मस्तकी मुगुट चढवू पहात आहे असे जाणवते. 'तकषीं'च्या 'एणिप्पटिकळ्'-प्रमाणेच केशवदेवांची 'अयकार' कादंबरी प्रचंड आहे. या कादंबरीत लेखकाने विविध जातिसमुदाय आणि त्यांचे विभिन्न सामूहिक जीवन यांचे चित्रण केले आहे. 'ओडयिल् निन्नू' या कादंबरीच्या वाट्यास जेवढी स्तुती–प्रसिद्धी आली तेवढी हिच्या वाट्याला आली नसण्याची सहज शक्यता आहे. तथापि, भावनाविष्कार आणि कलात्मक विचारगांभीर्य या गुणविशेषांमुळे ही कादंबरी केशवदेवांच्या अन्य कोणत्याही कादंबरीहून सर्वश्रेष्ठ ठरली आहे. त्यांच्या सर्व कादंबऱ्यांत ही कादंबरी उजवी आहे, श्रेष्ठ आहे.

'तकषी'च्या सर्वोत्कृष्ट साहित्यकृती ज्या काळात लिहिल्या गेल्या, निर्माण झाल्या, तो काळ सामूहिक जीवनावरील कादंबऱ्यांचा युगकाल मानला जातो. या कादंबरीकारांना समाजजागृतीच्या उसळत्या लाटांनी आकर्षित केले होते.

'उरूब' आणि बषीर सर्वसामान्य समाजपद्धती, सामाजिक रूढि-परंपरांची चाकोरी आणि समाजावर नियंत्रण ठेवणाऱ्या— समाजधुरीण व्यक्तींच्या अंतस्थ गाभ्याचा अगदी सरळ सरळ वेध घेणारे लेखक आहेत. 'उरूब' लिखित 'उम्माच्चू'ची गणना मल्याळममधील श्रेष्ठ प्रतीच्या कादंबऱ्यांमध्ये केली जाते. त्यांची 'सुंदरिळुम् सुंदरन्मारुम्' ही कादंबरी तर विश्वसाहित्यातील महान कादंबऱ्यांचे स्मरण करून देते. कालपरत्वे मानवात आणि मानवाच्या योगे जी स्थित्यंतरे घडून येतात त्या प्रभावाची परिणाम-परंपरा एखाद्या चित्रपटासारखी प्रस्तुत कादंबरीत उलगडत जाताना दिसून येते. 'कुञ्ञमयुं कूट्टुकारुम्' नावाची त्यांची ललित आख्यायिका म्हणजे लेखकाने समाजापुढे धरलेला आरसाच वाटतो. 'उरूब' हे बषीरच्याच तोलामोलाची सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त झालेले लेखक आहेत. 'तकषी'प्रणीत क्रांति-उद्‌बोध वा केशवदेवांचा धार्मिक रोष यांच्या साहित्यात प्रत्ययास येत नाही. एखाद्या ऋषिमुनीप्रमाणे एकाग्रतेने यांची साहित्यनिर्मितीची तपस्या चालू असते. ही एकाग्रता आणि त्यापोटी निर्माण होणारे गांभीर्य हेच यांच्या कादंबऱ्यांचे वैशिष्ट्य आहे.

'पोट्टक्काट्टू' यांच्या साहित्यनिर्मितीचा प्रारंभ अशा एका काळात झाला की जेव्हा सारे जग अशांततेच्या आवर्तात अगतिकतेने भरकटत होते, क्षुब्ध होत होते. केशवदेव त्याचप्रमाणे 'उरूब'यांच्या तोलामोलाचे कादंबरीकार आहेत. यांच्या साहित्यकृतीतून काव्यरस जणू दुथडी भरून वाहत असतो. खरे सांगायचे म्हणजे ते कादंबरीकारापेक्षा कवीच अधिक आहेत. मल्याळम भाषेतील तंत्रमंत्रांचा बडेजाव झुगारून देणारे

स्वच्छंदतेचा पुरस्कार करणारे जे कोणी आहेत त्यात ते सर्वश्रेष्ठ मानले जातात. त्यांनी अशा कित्येक कथाकादंबऱ्या लिहिल्या आहेत की ज्या सृजन-क्रांतीच्या धगीत होरपळणाऱ्या वाचकांच्या काळजाला चंदनउटी लावल्यागत शीतलता प्राप्त करून देण्यास समर्थ ठरल्या आहेत. असे असले तरी त्यांच्या साहित्यकृती काही केवळ भावुकतेचे फुलोरे नाहीत. उदाहरणार्थ, त्यांची 'विषकन्या' काही केवळ एक प्रणय-कथा नाही, समृद्धी आणि संपत्तीच्या शोधात तिरुवितांकूरहून वयनाडूच्या डोंगराळ प्रदेशात वस्तीला जाणाऱ्या शेतकऱ्यांची ती कथा आहे. एका प्रवासी जथ्याच्या—प्रवाश्यांच्या तांड्याच्या—आशा-निराशेची कहाणी सांगणारा समर्थ इतिहास आहे तो. ज्याप्रमाणे 'तकषी'ची 'चेम्मीन'; बषीर यांची 'बाल्यकाल सखी'; केशवदेवांची 'ओडयिल् निन्न्' आणि 'उरूब' यांची 'उम्माच्चू' ह्या मल्याळम भाषेतील महत्त्वपूर्ण अशा श्रेष्ठ कादंबऱ्या आहेत. त्याचप्रमाणे 'विषकन्या' ही त्यांची कादंबरीही एक श्रेष्ठ अशी महत्त्वपूर्ण कादंबरी आहे. 'विषकन्या'-इतकीच महत्त्वाची अशी प्रस्तुत लेखकाची आणखी एक कादंबरी म्हणजे 'तेरुविंटे कथा' एका सर्वसामान्य शहरातील एका गल्लीच्या कहाणीद्वारे देशातील सामाजिक मूल्यांवर लेखकाने प्रकाशझोत टाकल्यासारखे केले आहे.

मल्याळम भाषेतील कादंबरीकार सर्वसामान्यपणे नव्या शैलींच्या स्वीकाराबाबत पराङ्मुख राहिले आहेत. लालित्यपूर्ण रचना हे 'तकषी' आणि 'पोट्टक्काटू' यांच्या कादंबऱ्यांचे एक लक्षणीय वैशिष्ट्य आहे असे म्हटले पाहिजे. कमालीची भावपूर्णता हा मल्याळम कादंबऱ्यांचा प्राण आहे. आगळ्या धैर्याने नव्या शैलीचा प्रयोगपुरस्कार मल्याळममध्ये करणारे एम. टी. वासुदेवन नायर हे पहिलेच कादंबरीकार होत. त्यांनी मार्सेल प्राउस्ट आणि जेम्स जॉइस यांच्या साहित्यकृतीतले कलामर्म आत्मसात करून मल्याळम कादंबरीच्या भावनाप्रधानतेला धक्का न लावता स्वत:ची एक स्वतंत्र शैली निर्माण केली. कादंबरीचा विकास तिच्या नायक-नायिका वा अन्य पात्रांच्या आवतीभोवती होत नसतो तर तिच्या पात्रांच्या अंतर्यामी व्हायला हवा– ह्या गृहीत तत्त्वाच्या आधारे वासुदेवन नायर यांच्या शैलीचा जो आविष्कार त्यांच्या कादंबऱ्यांतून वाचकांना जाणवला त्यामुळे अनुभूतीचे एक सर्वस्वी नवे असे दालन आपल्याला खुले झाले असल्याचे त्यांच्या प्रत्ययास आले. केवळ नवी शैली हेच एकमात्र त्यांच्या कादंबऱ्यांचे वैशिष्ट्य नाही. चंदू मेनवन यांनी मातृसत्ताक समाजपद्धतीच्या ऱ्हासाचे जे भविष्य चित्र आपल्या कादंबऱ्यांतून ओझरते रंगविले ते वासुदेवन नायर यांच्या कादंबऱ्यांतून पूर्णतेने आकारास

आल्याचे प्रत्ययास येते. त्यांचे सारे कथानायक परंपरेच्या काटेरी पाशातून मुक्त होण्याच्या धडपडीत खरचटून सोलून निघून स्वतः रक्तबंबाळ झालेले लोक आहेत. बंडखोर–क्रांतिकारकांचे रेखाटन आपल्या साहित्यकृतीतून करणारे वासुदेवन नायर हेच पहिले मल्याळम कादंबरीकार होत. 'नालुकेट्टू' ही त्यांची सर्वोत्कृष्ट कादंबरी, रूढि–पारंपरिकतेच्या घोर काळोखात बुडालेल्या एका नायर कुटुंबाच्या सर्वनाशाची कहाणी आहे. 'कालम्' नावाच्या त्यांच्या नव्या कादंबरीत स्वातंत्र्योत्तर कालात भारतात जे मूल्यपरिवर्तन घडून आले त्याचे चित्रण आहे. एक गोष्ट निःसंकोच मनाने, निर्विवादपणे मान्य करायला हवी की अनुपम अशी काव्यात्मता लाभलेली गद्य शैली, थोर सत्त्वशीलतेचे मूर्तिमंत अवतार असे नायक–नायिका आणि स्त्रीच्या महानतेचे प्रतीक-रूप अशा नायिका यांच्या बळावर एवढा लोकप्रिय झालेला कादंबरीकार मल्याळम भाषेमध्ये आजवर कोणी झाला नाही.

वर उल्लेख केलेल्या कादंबरीकारांच्या व्यतिरिक्त आणखीही काही कादंबरीकार आहेत. 'पारप्पुरम्'[1], के. सुरेन्द्रन्, ई. एम्. कोवूर, 'कोविलन' आदी नावे यात विशेष उल्लेखनीय आहेत. 'पारप्पुरम्' यांच्या कादंबऱ्यांतून सैनिकजीवन आणि केरळमधल्या ग्रामीण विभागातल्या कथा पर्याय रूपाने प्रतिबिंबित झाल्याचे प्रत्ययास येते. के. सुरेन्द्रन यांच्या कादंबऱ्यांचा विषय कौटुंबिक जीवनातील नानाविध संघर्ष हा आहे. विषय-वैविध्य हे कोवूर यांच्या कादंबऱ्यांचे वैशिष्ट्यच आहे. 'कोविलन' यांनी प्रखरतेने सैनिकजीवन आपल्या कादंबऱ्यांतून चित्रित केले आहे तेवढे अन्य कोणाही मल्याळम कादंबरीकाराने केल्याचे आढळत नाही. केरळमधील कादंबरी ह्या साहित्यप्रकाराच्या अभिवृद्धीप्रीत्यर्थ, जे प्रयत्न आजवर झाले त्यात या लेखकांचा वाटा काही कमी नाही.

वैकम् मुहम्मद बषीर हे एक असे कादंबरीकार आहेत की, ज्यांनी स्वतः सर्वमान्यतेच्या बळावर मल्याळम साहित्यात प्रतिष्ठा प्राप्त केली आहे. त्यांच्या तोलामोलाचा म्हणून गणल्या गेलेल्या लेखकांपैकी बहुतेक जण आज केवळ आढाव्यातील उल्लेखापुरते उरले आहेत. फक्त प्रतिनिधित्वाचे धनी झाले आहेत. परंतु वैकम् मुहम्मद बषीर हे साहित्य-भीमच म्हटले पाहिजेत. सर्व प्रकारची साहित्य-विषयक समालोचने आणि विवेचने पूर्ण पचवून मल्याळम साहित्यविश्वात ते आजही उंच मानेने ठामपणे पाय रोवून उभे आहेत. आज त्यांचे एवढे वय झाले आहे तरीही सहस्रावधी

---

१. इथे 'ऱ' चा उच्चार जीभ जरा आत ओढून रेडियोतल्या 'आर' प्रमाणे करावा.

वाचकांचे ते आराध्य दैवत कायम आहेत. नव-जागृतीच्या युगाची नवी सृष्टी निर्माण होऊनही अन्य अनेक लेखकांप्रमाणे स्वहितार्थ या नव्या लाटेबरोबर प्रवाहपतिता-प्रमाणे ते वाहवत गेले नाहीत. त्यांचे महत्त्व कोण्या एका युगापुरतेच वा कालखंडा-पुरतेच मर्यादित नाही. मग हे असे आहेत तरी कोण ? आणि कोण आहेत त्यांच्या कथेतील पात्रे ?

बषीर नामक लेखक जाणून घ्यायचा असेल तर प्रथम बषीर नावाचा माणूस नीट समजावून घ्यावा लागेल. ज्या वेळी स्वातंत्र्यसंग्राम घनघोर चालू होता, स्वातंत्र्याच्या चळवळीला प्रचंड उधाण आले होते, अशा वेळी तरुण बषीरने आपले घरदार सोडले आणि सर्वस्वासह त्यात स्वतःला झोकून दिले. कोषिकोटू (कालिकत) च्या सागरकिनारी बैठक मारून त्याने मीठ तयार केले. या मिठाच्या सत्याग्रहामुळे पोलिसांचा धाक-दपटशा आणि कारावास यांना तोंड देण्याची त्यांच्यावर वेळ आली स्वातंत्र्यसंग्रामाचा धगधगता वन्ही काळजात वागवीत त्यांनी भारतभर अन विदेशीही खूप भ्रमंती केली. नवनिर्माणार्थ झटणाऱ्या युगप्रवर्तक साहित्यिकां-प्रमाणेच बषीर यांच्या अंतर्यामी क्रांति-भावनेचा स्फुल्लिग प्रज्वलित झाला होता. 'जन्मदिनम्' नावाच्या कथेत बषीर यांनी घोषित केले; "माझं रक्त, मांस अन सारी हाडं काडं ही भारताचीच आहेत." परंतु त्यांच्या कथांचा आंतर गाभा, मूलाधार, अंतःसत्व–धार्मिक-रोष वा राष्ट्रीय उद्‌बोध— राष्ट्रजागृती हा नाही. आपल्या अंतःकरणात धगधगणाऱ्या क्रांति-भावनेला शांत, संयत असे वळण लाव-ण्याची एक विशेष स्वरूपाची जागही त्यांच्या ठायी होती आणि ह्या जाणिवेमुळेच 'तकषी' काय किंवा केशवदेव काय या दोघांहूनही सर्वस्वी भिन्न असा साहित्यपिंड बषीर यांच्या ठायी आकाराला आला. या दोघांहून एक खास असे वेगळेपण त्यांना लाभले.

बषीर उन्माद रोगाने ग्रस्त झाले होते. त्यांना वेड लागले होते. वेड्यांच्या इस्पि-तळात वेड्यांच्या सान्निध्यात राहूनच त्यांनी आपली 'पात्तुम्माची शेळी' (पात्तुम्मा-युटे आटू) ही लघुकादंबरी लिहून पुरी केली. प्रस्तुत कादंबरिकेच्या प्रस्तावनेत ते आपली त्या काळातली एक आठवण ग्रथित करतात: "अवतीभोवती पंचवीस-तीस वेडे. हातकड्या घातलेले, पायात बेडी, दंडा वगैरे ठोकलेले असे नानाविध प्रकारे काबूत ठेवले गेलेले लोक..." बषीर यांच्या अस्थिर मनात वावरणारे विचार वा विश्वास असंबद्ध स्वरूपाचे नव्हते. विश्वाचा पसारा आणि त्यात दाटून आलेला काळोख – हे होते त्यांचे त्या काळातल्या चिंतनाचे विषय. बषीरना झालेला उन्माद,

बषीरना लागलेले वेड, बषीर नामक साहित्यिकाच्या वाट्याला आलेल्या अहो-भाग्याचा एक भाग आहे.

बषीर क्रांतिकारकापेक्षा अधिकतर सत्यान्वेषक आहेत. ज्या काळात त्यांचे समकालीन लेखक समाजवादी वास्तववादावर आधारलेल्या कथाकादंबऱ्या लिहीत होते त्या काळात ते 'एट्टुकाली मम्मूञ्ञू' आणि 'आनवरी रामन नायर' सारख्या विनोदी कथा लिहण्यात मशगुल होऊन गेले होते. आजकाल 'स्थलत्ते प्रधान दिव्य-न्मार', 'आनवारियुं पोनकुरिशुम्', 'मुच्चीट्टू कळिक्कारंटे मकळ्' या त्यांच्या कादंबऱ्या श्रेष्ठ प्रतीच्या विनोदी कथा मानल्या जातात. असे असले तरी बषीर हे काही विनोदी लेखक नव्हते. 'पात्तुम्मायुटे आटू'च्या प्रस्तावनेत ते म्हणतात "ही एक विनोदी कथा आहे–हास्यकथा आहे–परंतु ही लिहीत असताना माझ्या अंतर्यामी मात्र आगडोंब उसळत होता–" बषीरच्या लेखी त्या आगीच्या होरपळा-तून स्वतःची सुटका करून घेण्याचा मार्ग म्हणजे लिहीत रहाणे हा एकच होता.

वास्तव सामाजिक स्थितीकडे बषीरने डोळेझाक नाही केली, 'उरूब'प्रमाणेच समाजातील संकुचित क्षुद्रतेतील अगाध विविधतेचा ठाव घेण्याचे सामर्थ्य त्यांच्यातही होते. याचे उत्तम उदाहरण आहे त्यांचा 'न्टुप्पाप्पयक्कोरानेंडार्नू' (माझ्या आजो-बांचा एक हत्ती होता) नामक ग्रंथ. हा म्हणजे सामाजिक पातळीवर खळबळ उड-वून देणारी, वादळ उठविणारी एक कादंबरी आहे. बषीरच्या बहुतांश कथा-कादं-बऱ्या केरळमधील मुसलमान समाजाच्या एकंदर परिस्थितीचे चित्रण करणाऱ्या आहेत. 'पात्तुम्मायुटे आटू', 'मुच्चीट्टुकळिक्कारंटे मकळ्' आदी साहित्यकृती बषीर आपल्या समाजाचे वर्णन करावे ह्या हेतूने लिहीत असल्याचे जाणवत नाही. वास्तव जीवनातून उचललेले कन्या-पात्र त्यांच्या कादंबऱ्यांची प्राणशक्ती आहे. 'न्टुप्पाप्पयक्कोरनेंडार्नू'मध्ये त्यांनी आपल्या समाजाला चिकित्सेसाठी जणू बृहत्दर्शक यंत्राखाली घेतले असे प्रकर्षाने जाणवून जाते.

वर उल्लेख केलेली साहित्यकृती कुञ्ञी पात्तुम्मा नामक एका निष्पाप आणि निरागस अशा बालिकेची कथा आहे. बषीर पात्तुम्माविषयी म्हणतात: "अगदी लहानपणापासूनच पशुपक्ष्यांवर–प्राणिमात्रांवर प्रेम करणारी एक छोटीशी बालिका–" अंधविश्वासाच्या आसाभोवती फिरणाऱ्या एका कुटुंबाची ही कथा आहे. पिढ्यान्-पिढ्या रक्तात भिनलेल्या जाति-स्पर्धेचे, धार्मिक विद्वेषाचे वर्णन बषीर अशा शब्दात करतात: "आजोबांच्या हत्तीने सहा जणांना ठार केले. साहीच्या साही माहूत काफिर (हिन्दू) होते. एकाही मुसलमानाला त्या हत्तीने मारले नाही." अम्मीजान म्हणाली,

" खऱ्याची समज असलेला हत्ती होता तो ! "

बषीरच्या अन्य साहित्यकृतींप्रमाणेच ही कादंबरीही छोटीच आहे. या कादंबरिकेची भाषा लालित्यपूर्ण आहे, काव्यात्म आहे. पवित्र कुराणातील विविध अवतरणे आणि उपकथानके ह्या कादंबरिकेचे सौंदर्य वाढवतात. मुसलमान समाजाच्या अज्ञात पैलूंवर प्रकाश पाडणाऱ्या अनेक कादंबऱ्या मल्याळममध्ये लिहिल्या गेल्या आहेत. त्या सर्वांत ही कादंबरी प्रमुख आहे. बषीरने ती अशा काळात लिहिली की जेव्हा मुसलमान समाजाच्या विरुद्ध ब्र काढण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. या कादंबरीवरून स्वतःला समाजसंरक्षक—समाजाचे रखवालदार म्हणवणाऱ्या महाभागांनी बषीरवर चिखलफेक करण्याचा खूप प्रयत्न केला. एके काळी तर कायद्याने हिच्यावर बंदी आणली गेली होती. बषीरच्या साहित्यातील कोणत्याही पात्राविषयी आपल्या मनात कधी घृणा—तिरस्कार वगैरे निर्माण होणार नाही – होत नाही. कुञ्ञि पात्तुम्माची निराशा त्याचप्रमाणे अनंत अश्रु-प्रवाह याचे कारण आहेत तिचे वडील. ह्या पात्राची निर्मिती बषीर यांनी अशा काही ढंगाने केली आहे की वाचकांच्या दया आणि सहानुभूतीचा ते विषय होऊन बसले आहे. यावरून एक गोष्ट सिद्ध होते की बषीर क्रांतिकारकाहून मानवप्रेमी अधिक आहेत.

मल्याळम कादंबऱ्यांचा मूलमंत्र आहे समसामायिकता. याचाच अर्थ चालू काळाचे, प्रचलित समस्यांचे प्रतिबिंब कादंबरीत पडले की पुरे – हे सारे तात्कालिक स्वरूपाचे लेखन – एकदा तो काळ निघून गेला, मागे पडला की त्यातले स्वारस्य नष्ट होते. याचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे 'ओडयिल् निन्नू' ही कादंबरी. एके काळी प्रभावी वाटणारी, गाजलेली ही कादंबरी ते प्रश्न आणि ते कालमाहात्म्य संपताच काळ मागे पडताच नीरस वाटू लागली. 'ओडयिल् निन्नू'ची ही गत तर मग तिच्या स्वरूपाच्या अन्य कादंबऱ्यांचे काय होत असेल याचा विचारच करणे नको. परंतु बषीर यांच्या कादंबऱ्यांना अशा कोणत्याही चाकोरीच्या आधाराची आवश्यकता जाणवत नाही. याचे प्रमुख उदाहरण आहे वर उल्लेख केलेली कादंबरी.

वाचनाची आवड असलेल्या कोणाही मल्याळी माणसाला 'बाल्यकाल सखी' (बालमैत्रीण) अपरिचित नाही. विश्वाचे कोडे उकलू पाहणाऱ्या बषीर यांच्या कादंबऱ्या लोकगीतांप्रमाणेच सरळ, साध्या आणि लालित्यपूर्ण आहेत. त्यांच्या वाक्या-वाक्यांतून सुरेल वीणारव झंकृत होत असतो. 'तकषी' अथवा 'उरूब'-प्रमाणे बषीर यांनी पृष्ठविस्ताराने प्रचंड अशा कादंबऱ्या लिहिल्या नाहीत. शब्दांवर येवढी हुकमत असलेले आणि शब्दांचा वापर इतक्या अर्थपूर्ण संयमाने करणारे

कादंबरीकार मल्याळीमध्ये विरळाच ! बषीर यांच्या लेखनकौशल्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे त्यांची 'बाल्यकाल सखी'. वरवर पाहता ती एक प्रेम-कथाच आहे. पण या प्रेमकथेच्या छायेत माणसाचे भाग्य आणि जीवनाचे मर्म यांचे दर्शन वाचकाला घडते. त्यांचा एक-एक शब्द म्हणजे आरतीच्या वेळी होणारा घंटानादच — मन भानावर आणणारा — चित्तवृत्ती मांगल्याने भारून टाकणारा. एका छोटयाश्या पोत्यात साऱ्या विश्वाचे रहस्य ठासून भरण्याचे लेखकाचे हे कलाकौशल्य विलक्षणच म्हटले पाहिजे.

जी एकदा वाचायला घेतली की पुरी केल्याशिवाय खाली म्हणून ठेववत नाही अशी बषीर यांची आणखी एक कादंबरी म्हणजे : 'पात्तुम्मायुटे आटू' वा 'पात्तु-म्माची शेळी' —परंतु खरे म्हणजे बषीर यांच्या लेखनकौशल्याचे ते एक व्यवच्छेदक लक्षणच आहे. त्यांच्या सर्वच कादंबऱ्यांमध्ये वाचनीयता हा गुण सारख्याच प्रकर्षाने प्रत्ययास येतो. लहानथोर, तरुणवृद्ध अशा सर्व प्रकारच्या आणि सर्व थरांतल्या वाचकांना बषीर यांच्या कादंबऱ्यांची मोहिनी पडते याचेही कारण हेच आहे.

'बाल्यकाल सखी'प्रमाणेच 'पात्तुम्मायुटे आटू' ही कादंबरीही छोटेखानीच आहे — उण्यापुऱ्या शंभरएक पृष्ठांच्या मर्यादेत सामावलेली आहे. 'एणिप्पटिक', 'आळकूट्टम्' आदि अनेक जाडजूड कादंबऱ्या मल्याळममध्ये आहेत, परंतु त्यांच्यात कादंबरीरचनेसंबंधीचे पूर्वापार चालत आलेले नियम वा संकेत पाळले गेले असल्याचे मुळीच दिसून येत नाही. या दृष्टीने विचार करता बषीर अग्रगण्य मानावे लागतील. व्हिक्टर ह्यूगोपासून प्रेरणा घेतलेल्या लेखकांनी त्यांच्या वाक्प्रवाहाचा, धबधब्याप्रमाणे धोधो वाहणाऱ्या शब्दसंभाराचा अनुकार नाही केला. मल्याळम कादंबरीकार शब्दावडंबराने नव्हे, तर वाक्संयमाने आत्माविष्कार साधतात. 'पात्तुम्मायुटे आटू' ही बषीर यांच्या स्वतःच्याच कुटुंबियांची कहाणी आहे. या कथेतील पात्रे त्यांचेच भाऊ, बहीण, आई वगैरे मंडळी आहेत. परंतु त्यांची लेखन-शैली आणि अभिव्यक्तीचा घाट असा आहे की ती केवळ त्यांच्या कुटुंबापुरती मर्यादित राहात नाही. ती तुमची-आमची आपल्या सर्वांचीच कहाणी होऊन बसते. ह्या कादंबरीत बषीर यांनी एका छोटयाशा गावातील घराला विश्वरूपाचा विस्तार प्राप्त करून दिला आहे.

बषीर कोणा एका व्यक्तीची, वा व्यक्तींची, कुटुंबाची वा जातिसमूहाची कथा सांगत नाहीत. ते मानवी जीवनातील केवळ एखाद्या घटनाप्रकाराचे वा प्रकरणाचे भाष्यकार नाहीत, तर ते आहेत सत्यान्वेषक — सत्यशोधक — सत्याचा मागोवा

घेऊ पहाणारे — त्यांचे विचार, भावभावना आणि कल्पना हे सारे पर्वतांच्या दुर्गमतेत, सागरी लाटांच्या झंजावाती तांडवात आणि आकाशाच्या अथांगतेत विहार करतात. त्यांची शोधक बुद्धी विश्वाच्या उत्पत्तीपर्यंत जाऊन भिडते. ते आपल्या एका नव्या साहित्यकृतीचा आरंभ कसा करतात, ते जरा पहा : " अनंत शून्यता... अर्थात अभाव ... ह्या शून्यातून ... ह्या पोकळीतूनच सारे निर्माण झाले. ज्ञात तसेच अज्ञात ... " (ओर्मयुटे अरकळ्).

वेडामुळे हलक्या झालेल्या आपल्या डोक्यात विश्वाच्या रहस्याच्या चिंता-काळज्या करून, आपल्या टकलावरून हात फिरवीत हसत बसला आहे बषीर – हाच खरा बषीर आहे – अणि त्याचे साहित्य जाणून घेण्याची पद्धतही हीच आहे.

मल्याळम कादंबरी विकासाच्या नानाविध नव्यानव्या अवस्थांतून जात आहे. सांकेतिक वा पारंपरिक शैलीच्या संदर्भात एम. टी. वासुदेवन नायर यांनी घालून दिलेली वळणे ओलांडून लेखकवर्गाने आज केवढी प्रगती केली आहे ! नव्या पिढीच्या जीवन-आदर्शांची त्यांनी पार वाट लावून टाकली आहे. नवी मूल्ये, नवे जीवनादर्श, त्याचप्रमाणे लेखनशैलीने घेतलेली नवी वळणे यांच्या समवेत मल्याळम कादंबरी प्रगती करीत आहे. या प्रगतीत, विकासात, पुरोगामित्वात आणि बदल-परिवर्तनाच्या या झंजावातात, बषीर एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे ताठ मानेने आपल्या जागी पाय घट्ट रोवून अचल उभे आहेत.

**एम. मुकुंदन**

# १

फात्तुमा[१]ची शेळी अथवा स्त्रीबुद्धी ह्यासंबंधीची गोष्ट मी इथं सांगणार आहे.

बराच काळपर्यंत इकडं तिकडं भ्रमंती आणि एकांत जीवन व्यतीत केल्यानंतर नाकाच्या शेंड्यावर राग वागवीत जरा स्वस्थ निवांत दिवस घालवावेत म्हणून मी आपल्या घरी परतलो. वा: ! काय सुरेख स्वागत झालं माझं ! अस्सा राग आला की सांगायची सोय नाही ! साऱ्या अंगाची जशी लाही लाही झाली ! माझं घर... ! दोष तरी कुणाला देऊ ?

दहा-पंधरा वर्षं झाली, मी स्वतःच्या घरी कधी राहिलो नाही -- कधी काळी एखाददुसरी रात्र राहिलो असेन फार तर. एवढंच स्मरतं. आमच्या वडिलोपार्जित घरासमोरच्या मोठ्या रस्त्याच्या कडेला एक छोटंसं कौलारू घर आहे. ते बांधलं जात असताना मी त्याच्यासाठी खूपच परिश्रम केले होते. दगडमाती वाहून आणली होती. घर सुंदर व्हावं, निवांत वाटावं ह्यासाठी अनेक गोष्टी केल्या होत्या. घराला उंच दगडी भिंतीचं आवार घातलं होतं, आत अंगणभर पांढरी शुभ्र रेती पसरली होती...चारही बाजूंना सुंदर फुलझाडं लावली होती. जास्वंदीच्या झाडांवर मोगरा आणि चमेलीचे वेल चढवले होते. अंगणाच्या कोपऱ्यातनं पेरू आणि डाळिंबाची झाडं लावली होती.

---

१. फातिमा.

घराच्या आवारात दोन तळी आहेत. एक आंघोळीसाठी अन् दुसरं प्यायच्या पाण्यासाठी. एक शौचकूप खास माझ्यासाठी बनवला होता. परसदारच्या जमिनीत केळी नारळी लावल्या होत्या. आणखीही कितीतरी नाना प्रकारची झाडं मी तिथं लावली होती. नामांकित कलमी आंब्याची झाडंही त्यांत बरीच होती. सडकेच्या बाजूला कडेकडेनं केवड्याची झाडं मोठ्या आकर्षक पद्धतीनं लावून घेतली होती. नारळाच्या झावळ्या आणि काटेरी झाडांची सहा फूट उंचीची वई घालून घर आणि भोवतालची जमीन यांच्यातल्या सीमा निश्चित करून टाकल्या होत्या. समोर एक फाटक होतं, त्याला नेहमी कुलूप लागलेलं असायचं. फाटकाच्या गजातनं आतली फुलं आणि झाडं दृष्टीस पडत.

त्याच घरात मी एकांतवास पत्करून दिवस काढले होते. आयुष्य व्यतीत केलं होतं. चहा, खाणं, जेवण वगैरे सारं माझी आई फाटकावरून मला आत द्यायची. मी कुणालाही फाटकाआत पाऊल टाकायला देत नसे. दिवसभर आरामात बसून मी लेखन करायचो किंवा कधी काही वाचीत बसायचो वा झाडाझुडपांची निगराणी करीत घराभोवतीच्या आवारात इतस्ततः भटकायचो. ह्याच काळात जरा बाहेर फेरफटका करून यावं अशा विचारानं मी घर सोडलं. वर्कला, शिवागिरी, मद्रास, एरणाकुलम, कोयंपुत्तूर आदि ठिकाणी मी तीन-एक वर्ष वास्तव्य केलं. पुढे आजारी पडलो म्हणून घरी परतलो, अन् पाहतो तो काय; माझा धाकटा भाऊ अब्दुल खादर[1] यानं ते घर आपलं सरळ भाड्यानं देऊन टाकलेलं! एक्साइज इन्स्पेक्टर श्रीमान रामनकुट्टी आपल्या नोकरासह मारे तिथं आरामात रहाताहेत. त्यांना घर फारच आवडलं, पण तरीही सांगाल तेव्हा जागा खाली करून द्यायला ना नाही त्यांची -- पण करणार काय? ह्या गावात दुसरं घरच मिळत नाही ना भाड्यानं!

प्रकार असा घडल्यामुळं मी माझ्या वडिलोपार्जित घरी राहू लागलो. माझ्या बाबतीत पूर्ण विश्रांतीची अत्यंत जरुरी आहे. मला प्रकृती सुधारायची आहे. ज्यायोगे मनःशांती ढळेल, मनाचा तोल जाईल असं कुठलं काम करायचं नाही आणि असला गोंगाट, भांडणं, कटकटी यांचा उपद्रव होणार नाही ह्याची खबरदारी घ्यायची ही पथ्यं कटाक्षानं पाळायला हवीत. पण झालं असं की भांडणं, आरडाओरडा, गोंगाट अन कटकटी ह्या साऱ्यांच्या उपद्रवकारक आवर्तातच रहाणं मला क्रमप्राप्त झालं!

---

१. कादिर.

नारळाच्या झावळ्यांनी शाकारलेल्या छपराची एक छोटीशी वास्तू म्हणजे माझं घर अन ह्या घरात कोण कोण रहातं, आहे माहीत ?

माझी उम्मा[१], माझ्या पाठीवरचा भाऊ – अब्दुल खादर, त्याची बायको – कुञ्ञानुम्मा, त्यांची लाडकी लेकरं – पात्तुक्कुट्टी, आरीफा, सुबैदा[२]; त्यानंतर अब्दुल खादरहून धाकटा भाऊ – मुहम्मद हनीफा, त्याची बायको –– ऐशोम्मा[३], त्यांची लाडकी मुलं – हबीबू मुहम्मद, लैला, मुहम्मद रषीद[४]; हनीफाहून धाकटी असलेली बहीण – आनुम्मा, तिचा नवरा – सुलेमान, त्यांचा लाडका मुलगा –सैदू मुहम्मद; अन माझा सगळ्यात धाकटा भाऊ – आबू बकर.

एवढे हे मानवप्राणी. त्यांच्याव्यतिरिक्त, कुठून कुठून येऊन उम्माच्या आश्रयाला राहिलेल्या कित्येक मांजरी; त्यांच्या भयानं घराच्या छपरात सदैव खुडबूड खुडबूड करीत धावपळ करणारे हजारो मूषकवीर; घराच्या छपरावर विराजमान होऊन कर्णकर्कश काव काव करीत कान किटवणारे कावळे; अन त्याखेरीज माझ्या उम्मानं पाळलेल्या शंभर एक कोंबडया, त्यांची असंख्य पिल्लं आणि ती चोचीत पकडून गट्टम करण्यासाठी झाडांवर दबा धरून बसलेल्या घारी आणि गिधाडं !

घरात सदैव भयंकर कोलाहल चाललेला असतो. रषीद आणि सुबैदा अजून गुडघ्यावर रांगत नाहीत. एक दूध पितानाचं सोडलं तर सारा वेळ रडत असतात ती. आरीफा आता चालायला लागलीय पण तिचंही व्रत रडत रहाणं हेच आहे. तिच्यापेक्षा थोडे मोठे आहेत –– लैला आणि सैदू मुहम्मद. रडण्याबिडण्यात मोठे तरबेज आहेतच. अबी अन पात्तुक्कुट्टीदेखील रडण्यात कोणाला हार जाणारे नव्हत. रडण्यातच नव्हे तर हट्ट करण्यातदेखील. अबीचं शाळेतलं नाव आहे हबीबू मुहम्मद, परंतु घरात त्याला सारीजणं अबी म्हणतात. तो अन पात्तुक्कुट्टी पहिल्या इयत्तेत शिकताहेत. मुलं, मांजरी, कोंबडया, बायका, घारी, कावळे आणि उंदीर...सर्वांची मिळून खाशी सुंदर जत्रा भरते न् काय.

ह्या भयानक गोंधळात मी पाहिलं –– येऊन उभी ठाकली आहे एक शेळी.

तशी ती शेळीच आहे म्हणा –– भुरकट रंगाची, चांगली गुबगुबित. सकाळी सकाळीच ती आमच्या घरी येते अन सरळ स्वयंपाकघरात घुसून आपली न्याहारी

---

१. आई.

२. जुबैदा.

३. आयशा अम्मा.

४. रशीद.

उरकते. नंतर ह्या खोलीतून त्या खोलीत, असं भटकत झोपलेल्या मुलांबाळांना ठोकरा मार मारून जागं करते. त्यानंतर तिथून ती अंगणात जाते अन तिथं पडलेली फणसाची पानं लबालबा खाऊ लागते. अंगणाच्या एका कोपऱ्यात उभं असलेलं झाड तसं आता बरंच म्हातारं झालंय. पण अजूनही ते फळं धरतं. शेळ्याबोकडांच्या मुखी लागण्याइतपत त्याच्या पालापाचोळ्यालाही कधी तुटवडा नसतो. अंगणात पडलेली सारी पानं खाऊन होताच ती शेळी आपला मोर्चा जरा पलीकडे असलेल्या जांभळीकडे वळवते. खाली जमिनीवर पडलेली सारी जांभळं खाऊन फस्त करते. मग तिची नजर वर झाडाच्या शेंड्याकडे वळते...तिथं हिरव्या पानांच्या आड फिकट जांभळ्या रंगात बुडवून काढलेल्या हिमबिंदूप्रमाणे भासणारी जांभळं लहडलेली असतात. मागच्या दोन पायांवर उभी राहून खाली लवलेल्या फांद्यांना लागलेली फळं तोंडानं ओरबडायची धडपड करू लागते. पण व्यर्थ ! तिथपर्यंत ती पोहचूच शकत नाही. ह्या फांद्या वरच्या अंगानं खेचून कुणी वरं अशा जखडून बांधून टाकल्या ?

अशा प्रकारे टपून बसलेली असताना मध्येच अचानक कुठंतरी फणसाचं पान गळून पडतं. तिकडं ती लगेच धावते. चाटत चाटत पान तोंडात घेते अन मोठ्या चवीनं ते चघळत चघळत खाऊन टाकते. तेवढ्यात उम्मा अथवा कुंजानुम्मा वा ऐशोम्मा किंवा आनुम्मा—कुणीतरी अंगण झाडण्यासाठी झाडू घेऊन तिथं येऊन ठेपतं. शेळी झटकन तिथून पोबारा करते अन धावत धावत खोलीत शिरते... अन तिथंच इतस्ततः चकरा मारीत भटकत रहाते.

ही कुणाची शेळी आहे ? कशी स्वतःच्याच नादात मुक्त मनानं भटकत आहे ! कुठंही घुसते, कुठंही भटकते, काहीही करते, पण कुणी ब्र काढीत नाही ! कसलं हे घर? नाही इथं कुणी कुणाला विचारणारा, नाही इथं कुणी कुणाचं ऐकून घेणारा ! याला का घर म्हणतात ?

मी आरामखुर्चीत बसलो होतो. आता खोलीत कुणी कागद वगैरे फाडीत असल्यासारखा आवाज झाला. छोट्या दरवाजानं मी पाहिलं. तीच ती शेळी माझ्या बिछान्यावर उभी आहे अन पुस्तक खात आहे.

पेटीवर 'वाल्यकालसखी' आणि 'शब्दङ्ङल' ह्या दोन ग्रंथांच्या नव्या आवृत्तीची एक एक प्रत ठेवलेली होती. त्यातली 'बाल्यकालसखी'ची प्रत ती खात होती. पुढच्या दोन्ही पायांनी पुस्तक दाबून धरून ती वेळेला दोन-दोन तीन-तीन पानं जिभेनं चाटून चाटून तोंडात घेत खात होती. खाऊं दे झालं ! चांगली शेळी आहे.

'शब्दङ्ङल'ही आहेच. तेही खाऊन टाकायची हिम्मत करील का ही ?

काही कसला संकोच वा ओशाळेपणा नाही. 'बाल्यकालसखी' पोटात गडप झाली. निमिषार्धात तिनं 'शब्दङ्ङल'वर झडप घातली. दोन मिनिटांत उभ्या पुस्तकाचा तिनं फडशा पाडला. आता तिनं माझं कांवळं खायला सुरुवात केली. मग मात्र मला राहवेना. मी उडी मारून तिच्या जवळ जाऊन उभा ठाकलो.

"हे अज-सुंदरी, पुरे, कृपा करून ते कांवळं तेवढं खाऊ नकोस. त्याची किंमत पन्नास रुपये आहे अन ह्या पुस्तकांच्या आणखी प्रती आता माझ्याजवळ अजिबात नाहीत. माझी आणखीही बरीच पुस्तकं आहेत. ती सारी मी मागवून घेईन अन तुला विनामूल्य समर्पण करीन. मग तर झालं ?"

असं म्हणून मी तिला तिथून पिटाळून लावलं. तशी ती पुन्हा त्या फणसाच्या झाडाखाली धावत गेली. तिथं दोनतीन पानं पडली होती. बाईसाहेबांनी तीही उदरार्पण करण्यास प्रारंभ केला.

मी उम्माला बोलावलं न विचारलं, "कुणाची आहे ही शेळी ?"

उम्मा म्हणाली, "आपल्या पात्तुम्माची आहे ती."

"ओ हो ! म्हणून तिला इथं एवढं मोकळं रान आहे."

शेळी पात्तुम्माची आहे -- गोष्ट स्पष्ट झाली. दिवस उजाडायच्या आतच पात्तुम्मा दोरी सोडून तिला मोकळी करते अन कानमंत्र देते, "ते लोक अंगण झाडून फणसाची सारी पानं बाहेर फेकून द्यायच्या आत तू तिथं जा अन पोटभर चरून घे माझी लाडकी शेळी बाई ती !" एवढा उपदेश कानी पडताच शेळी जी निघते ती सरळ सडकेनं आमच्या घरी येऊन थडकते अन मग आपल्या एक एक करामती दाखवायला सुरुवात करते.

ही शेळीवाली पात्तुम्मा माझी बहीण आहे – अब्दुल खादरहून धाकटी. जवळच एकदीड फर्लांगावर बाजाराच्या मागं राहते ती. आपला नवरा कोच्चुण्णीचा चहा-फराळ सकाळी सकाळीच आटोपून त्याला कामधंद्यावर पाठवते. कोच्चुण्णी महाशयांनी आजवर अनेक धंदे करून पाहिलेत. सध्या त्यांचा धंदा दोरांच्या खरेदी-विक्रीचा आहे. एकदा सकाळचे गेले की थेट रात्र पडल्यावर घरी परततात.

कोच्चुण्णी कामधंद्याला गेला की भांडीबिंडी घासून, घराची झाडलोट सारं व्यवस्थित आटोपून पात्तुम्मा आपल्या मुलीला बरोबर घेऊन इथं घरी येते. येतेही मोठ्या टेचात. तिच्या पाठी पाठी एखाद्या शेपटासारखी खदीजा घुटमळत असते. तिचं चालणंही कसं स्वप्नात चालल्यागत अधांतरी असतं. पण दरवाजात पाऊल

टाकताच तिचा हा सारा नूर एकदम पालटतो. आवाज चढतो, मोठा होतो अन ते तसं होणं आवश्यकही असतं. उम्माची सर्वांत थोरली मुलगी आहे ना ती ! अन म्हणून इतर कुणाहीपेक्षा तिचा अधिकार मोठा आहे ह्या घरात.

पात्तुम्मा आली तसा मी नीट सावरून बसलो. सावधपणं, लक्षपूर्वक पाहू लागलो— ती आहे, तिची शेळी आहे, उम्मा आहे, धाकटी बहीण आहे, दोन भावजया आहेत. आता काय होणार आहे ?

पात्तुम्मानं घरात शिरताशिरताच धाकटी बहीण, उम्मा अन भावजयांना काहीशा अधिकाराच्या, मोठेपणाच्या तोऱ्यात विचारलं, " कुणी माझ्या शेळीला थेंबभर भाताची पेज तरी घातलीत का ? "

उम्मानं उत्तर दिलं, " शंभर कामं पडलीत इथं. तुला आपलं तुझ्या शेळीचंच तेवढं सुचतंय "

पात्तुम्मानं भावजयांकडे चौकशी केली, बहिणीला दमदाटी केली — म्हणाली, " अरे, तुम्हा सगळ्यांना मी नीट ओळखून आहे बरं ! " माहीत नाही आनुम्मानं ह्यावर तिला काय उत्तर दिलं ते परंतु पात्तुम्मानं उम्माकडं आपल्याला जीवनात किती कष्ट पडतात त्याचं खूप रडगाणं गायलं. नंतर जरा तक्रारीच्या स्वरात म्हणाली, "कुणी काही का न करीना. माझी शेळी एकदा विऊ दे. मग दाखवीन."

शेळी व्याल्यानंतर पात्तुम्मा काय दाखवणार आहे ?

जांभळाचं झाड आपल्या फळांच्याद्वारे मंद हास्य करीत होतं. मी ते सारं पहात आरामखुर्चीत पश्चिमेकडं तोंड करून पहुडलो होतो. तेवढ्यात त्या शरणार्थी मांजरी 'म्याऊं म्याऊं' करीत माझ्याजवळ आल्या. एक तर टुणकन उडी मारून चक्क माझ्या मांडीवर येऊन बसली. फारशी स्वच्छ नव्हतीच म्हणा ती.

ही का बरं माझ्या मांडीवर येऊन बसली ? आमची एकमेकांशी ओळख तर मुळीच नाही. कदाचित प्रथम दर्शनीच मी तिला आवडलो असेन. जाऊ द्या झालं ! त्या तशा अवस्थेतच मी सहज समोरच्या सडकेकडं पाहिलं, तो काय ! बऱ्याचशा मुली जाताना दिसल्या. हायस्कूलच्या विद्यार्थिनी होत्या त्या. साऱ्याजणी माझ्याच-कडं पहात होत्या. का बरं ?

पात्तुम्माच्या शेळीच्या पाठीवर एक कावळा येऊन बसला. त्याच्यासह शेळी माझ्या पुढ्यात येऊन उभी राहिली. कावळ्यानं गर्दन झुकवीत तिर्यक नजरेनं माझ्याकडं पाहिलं. जणू तो म्हणत होता, " कधी पाहिलंय पूर्वी असं आठवत तर नाही... "

माझ्या बाजूच्या पडवीत कितीतरी कोंबडचा काहीतरी टिपीत-वेचीत खात होत्या. कावळा उडाला आणि त्या मंडळीतच जरा एका बाजूला जाऊन बसला. कोंबडचांनी हा प्रकार पाहून त्याच्याकडं असं काही पाहिलं की जणू त्यांना म्हणायचं होतं, "इथं यायचा याला काय अधिकार ?" परंतु कावळ्याला त्याचं काहीएक सोयरसुतक नव्हतं. "मलाही इथं बसायचा पूर्ण अधिकार आहे." असा आत्मविश्वास दर्शवीत त्यानंही तिथंच टिपाय-वेचायला सुरुवात केली.

आता त्या सभेत प्रवेश केला एका सफेद मांजरीनं. कोंबडचांमध्ये जी एक थोराड काळी कोंबडी होती तिला हा मांजरीचा चोंबडा दालगजपणा मुळीच आवडला नाही. तिनं सरळ मांजरीच्या टाळक्यावर जोरानं टोच मारली. मांजरीनं एकदम फिस्कारून गुर्र केलं. तिच्या पाठीची कमान वर गेली, शेपटी ताठ उंचावली अन साऱ्या अंगावरचा रोमन रोम फुलून आल्यासारखा झाला. ती अशा काही पवित्र्यात उभी होती अन तिनं असा काही अवतार धारण केला होता की जणू ती म्हणत होती, "आत्ता दाखवून देते मला ह्या घरात काही अधिकार आहे की नाही ते. हिम्मत असेल तर व्हा पुढं. एक वार चोच मारून तर पहा मग बघा काय होतंय ते!"

"उम्मा ! तुम्ही पाहिलंत ?" काहीशा घोगऱ्या आवाजात बोलत माझ्या सगळ्यांत धाकटचा भावानं—अबू बकरनं आता त्या सभेत प्रवेश केला. धुऊन इस्त्री-बिस्त्री केलेले कपडे, व्यवस्थित विंचरून चापूनचोपून चमकदार केलेले मस्तकावरचे केस, चर्रचूं असा आवाज करणाऱ्या चपला...अशी एकंदर त्याची वेशभूषा ! हल्ली त्याला फक्त अबू म्हणून संबोधलं जातं. लोकांचं म्हणणं असं की हे महाशय लेफिटस्ट आहेत. दिवसातनं दोनदा कपडे वदलतात. उम्मा सांगते की त्यांच्यापाशी बुटांचे साठ जोड आहेत. दिसायला गवताच्या काडीसारखे किडकिडित अन नाजूक; पण आवाज कोण बुलंद... त्रिखंडात घुमत राहील असा ! पुन्हा स्वभावानं मोठे अभिमानी आहेत. मी येताच हे बाहेर निघून गेले. आजवर हे महाशय माझ्या खोलीचे सर्वाधिकारी बनून सत्ता गाजवीत होते. ही खोली बाप्पांनी मला अन अब्दुल खादरला अभ्यासाला निवांतपणा मिळावा म्हणून घराच्या एका बाजूला मुद्दाम बांधून घेतली होती. त्याच काळात मी अब्दुल खादरला वेगळं केलं. तो उम्माच्या जवळ झोपायला लागला. आता अब्दुल खादरचे सारे केस पांढरेधोप झाले आहेत. दिसायला तो माझा थोरला भाऊ वाटावा असा दिसतो. त्यानं माझ्या खोलीला जोडूनच आणखी एक खोली बांधून घेतली आहे. हनीफा आणि त्याची बायकामुलं जुन्या खोलीतच वास्तव्य करतात... दिवस धकवून नेताहेत. अबूला जेव्हा मी माझ्या

खोलीतनं बाहेर काढलं, तेव्हा तो आपली पेटी, अंथरूण-पांघरूण, पुस्तकं, लॅम्प वगैरे घेऊन हनीफाच्या खोलीत जाऊन थडकला.

अबूचा आवाज कानी पडताच मांजरींनी सूं बाल्या केला, कावळे उडून गेले, कोंबड्या सैरभैर धावायला लागल्या, पात्तुम्माची शेळी परसदारी बायकांच्या घोळक्यात आश्रयाला गेली, घारी आणि इतर पक्षी चिडीचुप्प होऊन कुठंतरी दडून बसले. सगळ्या मुलांनी रडणं बंद केलं. घर नि:शब्द झालं.

अबू तार स्वरात आरडाओरडा करीत विचारीत होता, "भाईजान, हे सारं का होऊ देता ? मांजरी, मुलं, कोंबड्या, शेळ्या, कावळे ... सारं सारं! शेळी पाळायसाठी एक जागा पाहून ठेवलीय मी ! साऱ्यांचा पुरा पुरा बंदोबस्त करून टाकीन मी. उम्मा आण तो वेत अन माझी गलोल इकडं !"

पात्तुम्मा काळजीयुक्त स्वरात म्हणाली, "खदीजा ! जा खेचून आण आपल्या शेळीला ! समजून चुकलं, आमचा ह्या घरात आता काही एक अधिकार नाही ! चल, ये ! उम्मीजान, आम्ही जातो हं."

अबू जोरानं खेकसत म्हणाला, "मीही पाहून घेईन ह्या घरात मला काही हक्क-अधिकार आहे की नाही ते. आज मी हनीफा भाईजान अन त्यांच्या पोराबाळांना खोलीबाहेर हाकलून काढल्याखेरीज रहाणार नाही."

मग मीही जोरानं ओरडलो, "ए, पोट्ट्या ! खबरदार– या घरात तुझा आवाज पुन्हा कानी आला तर ! हड्डी-पसली एक करून टाकीन. आहे तर काडी पैलवान, पण बोंबाबोंब केवढी ! हनीफा आपल्या मुलांना घेऊन कुठं राहील ते जरा सांग बघू ?"

"हनीफा भाईजाननी आपल्या जमिनीत घर बांधून रहावं !"

फार उत्तम. असं काही चाललंही आहे. घर बांधायच्या बाबतीत हनीफानं मला सांगितलंही आहे. त्यानं इथून दोन मैलांवर डोंगरपायथ्याशी सडकेला लागून ऐंशी सेंट जमीन खरेदी करून ठेवलीय. सध्या त्यानं तिथं उत्तम प्रतीची केळी वगैरेंची बाग केलीय. त्या तिथं एक घरही बांधायचंय. त्यासाठी लागणारं सारं सामानसुमान अन मदत माझ्याकडून मिळेल अशी उमेद तो बाळगून आहे. म्हणतो की – 'माझ्याजवळ पैसा नाही. भल्या पहाटे चार वाजता उठून पायी पायी तिथं जातो अन बाग शिंपून वगैरे सात वाजता घरी परततो. त्यानंतर अबी आणि लैलाला बरोबर घेऊन नदीवर आंघोळीला जातो. बाप अन मुलं एकमेकांना कसे घट्ट धरून आहेत. दोन्ही मुलं म्हणतात –– "आमच्या जागेत जेव्हा घर होईल ना, तेव्हा आम्ही तुम्हांलाही बरोबर राहायला घेऊन जाऊ." सैदू मुहम्मदनंही असंच सांगून ठेवलंय.

त्याची आई–आनुम्मा आणि बाप–सुलेमान जवळच्याच जमिनीवर स्वतःच्या राहण्यासाठी एक घर बांधून राहिले आहेत. त्यांचं अर्धअधिक काम पुरंही होत आलं आहे. दगड वगैरेही आणून टाकले आहेत. हनीफानं ह्यातलं अजून काहीच केलं नाही.

मी म्हटलं — "असं वाटतं, की हनीफाजवळ पैसे वगैरे नाहीत रे !"

अबू एक एक शब्द सावकाश उच्चारीत म्हणाला, "हनीफा भाईसाहेब भारी कंजूष आहेत. त्यांच्यापाशी खूप पैसा आहे."

"खोटी गोष्ट आहे. तुला काय समजतंय ?"

अबू रबराची गलोल अन थोडे गोल दगड घेऊन चिमण्या मारायला निघून गेला.

पात्तुम्मा शेळीला हाका मारीत मारीत हलके हलके ह्याच बाजूला आली... "ये ये ये, शेळी ये ! तो काही नाही करणार तुला !" अबू जवळच उभा होता. त्याला तिथं पाहून ती मोठ्यानं म्हणाली, "अरे अबू, जरा अदबीनं, नम्रतेनं वागत जा. बडे भाईजान आले आहेत, माहीत नाही तुला ?"

"ऐकलंत भाईजान ? बड्या बहिणाबाई आता मला अरे तुरे करून बोलायला लागल्यात ते ! आपण आल्यामुळं यांचा रुबाब आता भलताच वाढलाय." अबू म्हणाला.

अबूहून वयानं कितीतरी मोठी आहे पात्तुम्मा. वयानं वडील आहे ती त्याला ! तिनं ह्याला 'अरे अबू' म्हणून म्हटलं तर ह्याची अब्रू गेली, अपमान झाला !

मी म्हटलं, "तर आता आम्ही सगळे लोक तुला 'अबूसाहेब' म्हणत जाऊ. चल, चालता हो इथून."

पात्तुम्मा माझ्या जवळ आली. इकडं तिकडं पाहिलं — कुणीही नव्हतं. मग जरा गुप्ततेच्या आविर्भावात म्हणाली, "भाईजान ! कुणाला समजता कामा नये हं — आनुम्माला समजलं तर ती भांडायला येईल. ह्यापुढं, भाईजान, मला पैसेबिसे मुळीच देऊ नका हं, खदीजासाठी दोन कानांत घालायची फुलं करून दिलीत ना तरी खूप झालं. हनीफालाही याचा पत्ता लागता कामा नये. भाईजान ! छोटे भाईजान, उम्मा, अबू — कुण्णा कुण्णाला कळता कामा नये."

मीही जरा हलकेच विचारलं, "कानांत घालायची फुलं... चांदीची की सोन्याची ?"

पात्तुम्मानं पुन्हा इकडं तिकडं सावधपणं पहात म्हटलं, "सोन्याची भाईजान, सोन्याची ! पण कुणाला सांगणार तर नाही ना ?"

"मुळीच नाही. अगदी गुप्त ठेवीन हं सारं."

अशा रीतीनं पात्तुम्माबरोबर मी एका गुप्त करारानं बांधलो गेलो.

पात्तुम्मा म्हणाली, "कानातली फुलं लौकर हवीत हं –"

"बघतो." मी उत्तर दिलं.

कर्णफुलांबाबतचा हा बनाव इतक्या त्वरेनं घडून आला, यामागं एक कारण आहे. जेव्हा मी घरी स्वस्थपणं विश्रांती घ्यावी, निवांतपणं आयुष्य घालवावं म्हणून परत आलो, त्याच वेळी एरणाकुलमहून मी तीन छत्र्या मागवून घेतल्या होत्या. त्यांतली एक छत्री अब्दुल खादरची मुलगी पात्तुक्कुट्टी, दुसरी हनीफाचा मुलगा अबी अन उरलेली आनुम्माचा मुलगा सैदू मुहम्मद याला मी दिली होती. पात्तुम्माच्या मुलीला खदीजाला —— काही दिलं नव्हतं. ही चारही मुलं एकाच वयाची आहेत. भांडण्यात आरडाओरडा करण्यात, रडण्यात —— साऱ्या गोष्टींत कुणी कुणाला कमी नाही. सारखेबारखे आहेत. पण खदीजाला काही छत्री दिली नाही मी. कारण ? खरं म्हणजे केवळ विस्मरणामुळं हे घडलं. काही हरकत नाही. तिला सोन्याची कर्णफुलं मिळतील.

पात्तुम्मा आत गेली... घरकामात गुंतली, तेवढ्यात संधी साधून आनुम्मा माझ्याकडं आली. ती गरोदर होती. पात्तुम्मा शिकलीसवरलेली नाही. आनुम्माला लिहायवाचायला येतं. त्यामुळं आनुम्माचं बोलणंसवरणं पात्तुम्माहून वेगळं असतं. ती हळूच म्हणाली, "ह्यापुढं आपण मला पैसे देऊ नका हं —— भांडी घेऊन दिलीत तरी बस्स आहे मला अन तीही आजच नकोत काही —— आम्ही नव्या घरी रहायला गेलो म्हणजे मग द्या —— पण ही गोष्ट आपण कुणाला सांगायची नाही हं ——"

अर्थात् पात्तुम्माला हे कळता कामा नये, कळलं तर म्हणेल, "पुरे पुरे तुझी लपवाछपवी ! मोठी आलीय बालिस्टर ! माझ्या पश्चात वड्या भाईजानना तू पुरेपूर लुबाडलंस —— खरं की नाही ?"

एवढ्याचसाठी भांड्यांबाबतची गोष्ट ह्या कानाची त्या कानाला कळता कामा नये. आनुम्मासाठी घरात लागणारी भांडीकुंडी घेऊन देणं अन ही गोष्ट गुप्त ठेवणं ह्या करारनाम्यावरही मी सही करून मोकळा झालो. हे सारं झाल्यावर जरा कुठं मी निवांत बसलो असेन नसेन तोच आरडाओरडा कानांवर आदळला : "उल्लाटत्तिपारू ! उल्लाटत्तिपारू ! नाही, मी नाही घेऊन जाणार !"

हा आवाज लैलाचा होता. ही कुणाच्या नावानं असा शंख करत्येय ? फार वेळ नाही वाट पहावी लागली. झालेल्या अवमानामुळे, नाचक्कीमुळे तडकलेला, डोळे रडवेले झालेला सैदू मुहम्मद माझ्या पुढ्यात येऊन थडकला. उघडाबंब ! तीव्र चीड

व्यक्त करीत तो म्हणाला, " बडे मामूजान, लैला बघा कशी मला ' उल्लाटत्तिपारू ' म्हणून चिडवते --"

अरेरे ! चांगल्या मुलासारख्या मुलाला मुलीच्या नावानं हाक मारायची म्हणजे काय ! अन हाक मारणारीही पुन्हा मुलगीच !

" चल वेत आण ! "

सैदू मुहम्मद चटदिशी वेत आणायला गेला.

मी हाक मारली, " लैला, इकडं ये ! "

ती आली -- तशीच उघडीवंब आपली ! सैदू मुहम्मदनं आणलेल्या वेताकडं पहात म्हणाली, " चचाजानना नाही घेऊन जाणार मी --"

" नको नेऊस. " -- असं म्हणत मी सैदू मुहम्मदच्या हातून वेत घेतला. लैलानं जोरानं भोकाड पसरलं. " अम्मी ! अम्मी ! " ती आपल्या आईला ' अम्मी 'च म्हणते.

मी म्हणालो, " बोलाव आपल्या अम्मीला ! अब्बालाही बोलाव तुझ्या ! आणखी हवं तर उप्पुप्पालाही बोलाव -- सगळ्यांना धरून ठोकतो कसा. "

' उप्पुप्पा ' म्हणजे आजोबा. आईचे किंवा वडलांचे वडील. मला इथं अभिप्रेत आहेत ते लैलाच्या आईचे वडील. -- मातुल आजोबा. हे गृहस्थ रहातात हनीफाच्या केळीच्या बागेच्याच जवळपास. तिथं कुठं रेल्वे स्टेशन होणार आहे. अर्थातच त्यामुळं पुढंमागं तिथल्या जमिनींना चांगली किंमत येईल. इतकंच नव्हे तर त्या भागाचा चांगला विकासही होईल. ह्या सर्व गोष्टींचा विचार करूनच लैलाच्या या आजोबांनी हनीफाला ही जमीन विकत घ्यायला लावली. लैला म्हणाली, " अम्मीला मारू नका ! अब्बांनाही मारू नका ! उप्पुप्पांनाही मारू नका ..."

" तर मग आता ह्यापुढं कुणाला ' उल्लाटत्तिपारू ' म्हणायचं नाही. "

" नाही म्हणणार. "

" तुझ्या अब्बांनी घर बांधलं की सैदू मुहम्मदला बरोबर राहायला घेऊन जाशील ना तिथं ... ? "

" बडे चचाजाननाही घेऊन जाईन. "

आह ! निकालात काढला खटला अशा प्रकारे ! नुकसानभरपाईदाखल सैदू मुहम्मदला दोन टॉफी अन एक उत्तम प्रकारचं केळं दिलं. माझ्याजवळ अशा प्रकारची केळी, टोमॅटो, अननस, लॉसेंजेस वगैरेचं भांडार भरलेलं होतं. ह्यांपैकी फक्त टॉफी आणि लॉसेंजेसच काय ती मी पैसे टाकून विकत आणली होती ... पोरांचं

रडणंगागणं बंद करण्यासाठी. बाकी सारं माझे भाऊ, कोच्चुण्णी अन सुलेमाननं विकत आणून दिलं होतं. प्रकृतिस्वास्थ्यासाठी फलाहार मला अत्यावश्यक होता.

ह्या साऱ्या वस्तू सुरुवातीला मी टेबलावर ठेवीत असे. एक दिवस सैदू मुहम्मद टेबलावर चढून चोरून त्यातलं काही खाताना पकडला गेला. माझ्या समोर तो चोर म्हणून सिद्ध झाला याचं त्याला भयंकर दुःख झालं. त्यानं जोरजोरानं रडायला सुरुवात केली. ह्यापुढं त्याच्यावर रडण्याभेकण्याचा दुःखद प्रसंग कोसळू नये म्हणून मी ते सारं पेटीत बंदिस्त ठेवायची खबरदारी घेऊ लागलो.

सैदू मुहम्मदला केळं अन टॉफी खाताना पाहून लैलाला रडू फुटलं. मी तिलाही एक केळं आणि दोन टॉफ्या दिल्या. असं समजा की त्याचा वास अरीफाला लागला न तीही तिथं येऊन हजर झाली. तिलाही ते सारं दिलं. दोन दोन टॉफ्या त्यांच्या हाती सुबैदा आणि रषीदला धाडून दिल्या. मग तृप्त मनानं आनुम्माला सांगून कपभर चहा मागवला, विडी शिलगावली अन एक पुस्तक घेऊन आराम-खुर्चीत अंग झोकून दिलं.

अशा प्रकारे जरा आराम करीत पडलो असताना, माझी उम्मा तिथं आली. आईचं वय आता साठसत्तर सहज असेल. पण अजून सारे दात नीट शाबूत आहेत. सकाळी भल्या पहाटे चारलाच उठते ती. मग झऱ्याच्या पाण्यात भिजत टाकलेल्या नारळाच्या पत्त्या विणायला सुरुवात करते. विणणं आटोपताच ते सारं सुकायसाठी अंगणात पसरून ठेवते. म्हणजे सूर्योदय होताच त्या आपल्या सुकायला मोकळ्या.[1] हे काम आटोपताच घरातलं पाणी भरू लागते -- दोन्ही हातांत एक एक भरलेली घागर असा तिचा कामाचा तडाखा असतो. काम करता करताच पात्तुम्मा, आनुम्मा, ऐशोम्मा, कुंजानुम्मा यांना दमदाटी करणं -- फटकारणं चालूच असतं. रात्री जवळजवळ दहा वाजेतो तिचा कामाचा हा धबडगा सतत चालू असतो. ... क्षणाचीही उसंत न घेता. पात्तुम्मा नेहमीच काही आमच्या घरी वस्तीला असते असं नाही. तरीही घरात उण्यापुऱ्या चांगल्या तीन शहाण्यासुरत्या समजदार बायका आहेत. मग उम्मा असं मरेमरेतो काम का करते ? कष्ट का म्हणून उपसते ? गुपचूप आराम करीत नुसती बसून का रहात नाही ? ह्या साऱ्या प्रश्नांची उत्तरं

---

१. केरळमध्ये सामान्य स्थितीतल्या लोकांची घरे नारळाच्या झावळ्यांनी शाकारलेली असतात. ह्यासाठी नारळाची झाप मधोमध चिरून त्याचे दोन भाग केले जातात. ते एकदोन दिवस पाण्यात भिजत ठेवतात. ते चांगले नरम झाले की एका खास पद्धतीने ती विणून त्यांचे तट्टे बनवतात. तट्टे चांगले सुकले की छप्परादाखल घरावर घालतात.

उम्माजवळ तयार असतात -- " ह्या पोरींना काही म्हणता काही येत नाही -- घर कसं सांभाळावं ते त्या कधी शिकल्याच नाहीत."

" ठीक आहे. असं असेल तर शिकू दे त्यांना आता ! घराची सारी जबाबदारी त्यांच्यावर सोपवून दे, निदान शांतता तरी राहील घरात ?"

त्यावर तिचं उत्तर ठरलेलं -- " तुला घर प्रपंचातनं काय कळतंय ? एकटा जीव सदाशिव तू ! वीतभर पोट सारं तुझं ! "

ह्या स्पष्टीकरणानंही मी बधलो नाही तर म्हणते, " अरे, त्यांच्या पाठीशी तान्हीपारेठी पोरंबाळं आहेत. त्या कामात गुंतल्या तर पोराबाळांचं कोण पाहील ... कोण सांभाळील पोरांना ?"

ह्यावर माझी उपायसूचना अशी-" हवं तर एकीनं मुलाबाळांचं पहावं, बाकीच्या साऱ्यांनी घरकाम करावं."

" तुला बोलायला काय होतंय -- उचलली जीभ अन लावली टाळ्याला -- एकटा जीव न सदाशिव, सारं वीतभर पोट तुझं ! चल, आण, थोडे पैसे दे मला ..."

आमचं बोलणंचालणं अखेर असं पैशावर येऊन ठेपतं. हे माझ्या प्रकृतीला बाधक आहे. एवढ्याचसाठी उम्मा कितीही कष्ट उपसो, काहीही काम करो -- मी बघून न बघितल्यासारखं करतो. चक्क डोळ्यांवर कातडं ओढून स्वस्थ बसतो. का आपणच प्रथम उम्मापुढं पैशासाठी हात पसरावा ? उम्मा आल्या आल्याच म्हणाली, " अरे, एक दहा रुपये दे बरं जरा ! "

आता उम्माला मी असा काय उपदेश केला, की ज्यामुळं तिला पैसे मागणं भाग पडावं ? प्रश्नार्थक नजरेनं मी उम्माकडं पाहिलं.

उम्मा शांतपणं सांगू लागली, "अब्दुल खादरला पत्ता लागता कामा नये." हनीफालाही समजायला नको. आनुम्मा आणि पात्तुम्मालाही माहीत होता कामा नये."

मीही मग तितक्याच शांतपणानं गुप्ततेचा आव आणीत विचारलं, " कुंजानुम्मा आणि ऐशोम्माला सांगितलं तर काही हरकत नाही ना ? "

उम्मा रुष्ट झाली. म्हणाली, " द्यायचे असतील तर दे, सांगायचं मात्र कुणाला नाही. "

मीही मग जरा रागावल्यासारखं करीत म्हटलं, " इथं आल्यापासून किती पैसे दिलेत आजवर मी घरखर्चासाठी ? तुम्ही स्वतः उघडउघड अन गुपचूप किती पैसे घेतलेत माझ्याकडून ? "

उम्मानं पुन्हा गुप्ततेच्या स्वरात म्हटलं, " मी कधी कुठं म्हटलंय की तू पैसे

दिले नाहीस म्हणून ? आज आत्ता मला एक दहा रुपयांची गरज आहे म्हणून मागत्येय झालं."

"मी दिले ते सारे पैसे कुठं आहेत ? फार दिवस झालेत पैसे दिल्याला अशातलाही भाग नाही – मग गेले कुठं सारे पैसे मी दिलेले ? "

उम्मा हलकेच म्हणाली, "जरा हळू बोल. सगळे पैसे अब्दुल खादरनं नेले."

"अन त्याला मी वेगळे –– स्वतंत्रपणे पैसे दिले होते त्यांचं काय ? लंगडा कुठचा, येऊ दे त्याला एकदा ? "

अब्दुल खादरला लहानपणी पक्षाघात झाला होता. बाप्पांनी त्याच्या औषधोपचारासाठी हजारो रुपये खर्च केले होते, तरीही अखेर डावा पाय लंगडा तो लंगडाच राहिला. त्याचा डावा पाय अगदीच बारीक काटकुळा आहे. बाकी सारं शरीर चांगल सुदृढ आहे, निकोप आहे. डाव्या पायातल्या विकृतीमुळं त्याला चालताना आधार लागतो. लोखंडी छडी घेऊन चालतो तो.

"त्याच्याशी काही बोलू नकोस. काही असलं तरी एवढ्या मोठ्या कुटुंबाच्या पालनपोषणाची सारी व्यवस्था तोच पाहतोय ना ? तो नसता तर समजलं असतं! तू सडाफटिंग, फक्त आपलं पोट ! कुठंकुठं भटकत असतोस. मन मानेल तिथं राहून किती पैसे उडवलेस ? "

"त्याचं प्रायश्चित्त मी कधीच घेतलंय. त्याचा दंड मी कधीच चुकता केलाय. मीही खूप पैसे दिलेत घरात खर्चासाठी... "

"अरे, हळू ! हळू बोल ! नाही कोण म्हणतंय ? कुणाला कळता कामा नये, चल, मला आत्ता दहा रुपये दे !"

"ह्याच्या पूर्वी कुणाला न कळवतासवरता गुपचूप असे मी जे सारे पैसे दिले, ते सारे अब्दुल खादरने नेलेन कसे ? त्याला ही गोष्ट कळली तरी कशी ? "

"अरे, चूप ! अबी अन् पात्तुक्कुट्टीनं जाऊन सांगितली ही गोष्ट त्याला."

"उम्मा, आपल्या आपल्यात म्हणून एक गुप्त गोष्ट सांगतोय तुला—आणखी दुसऱ्या कुणाकडं बोलू नकोस. माझ्याकडं सारे मिळून फक्त एक पाच रुपयांची नोट तेवढी बाकी आहे. त्याव्यतिरिक्त एक तांबडा पैसाही नाही माझ्याकडं."

"तर आण –– देऊन टाक ती तेवढी." उम्मा ताबडतोब म्हणाली.

मी आजूबाजुला सावधपणे पाहिलं अन मग आत जाऊन ती नोट अन एक केळं घेऊन आलो. केळ्यांचा वास लागताच पात्तुम्माची शेळी एकदम तिथं येऊन थडकली. मी केळं सोलून खाल्लं. काही खातोय असं पाहून उम्माच्या शरणार्थी

मांजरी अन त्यांच्या राखणदारीत वाढणाऱ्या कोंबड्याही तिथं हजर झाल्या. केळ्याचं साल पात्तुम्माच्या शेळीला दिलं. पुन्हा जरा अवतीभवती पाहिलं-- आणखी काही खायला मिळेल अशा आशेनं शेळी अद्याप रेंगाळत राहिली होती. पण नाव घ्यायला माणूस असं कुणी नव्हतं आसपास. फक्त पात्तुम्माची शेळी, कोंबड्या अन मांजरी तेवढ्या दिसत होत्या. मोठ्या सावधगिरीनं गुपचूप ती पाचाची नोट उम्माच्या ओटीत घातली. उम्मानं चारी बाजूंना बारकाईनं पाहिलं. माणूसकाणूस कुणी नव्हतं. नोटेची घडी घालून तिनं ती आपल्या ओढणीच्या कोपऱ्यात गाठ मारून ठेवली अन सलूक्याच्या[1] आत चटदिशी लपवली. अन मग अशा थाटात बसून राहिली की जणू कसलं काही घडलंच नाही.

मी म्हटलं,--" आता आणखी काही सांग, उम्मा ? "

उम्मा म्हणाली, पहा बरं ! माझं आता असं वय झालंय-- कुणी सांगावं कधी कबरीत जाऊन पडावं लागेल. माझी एक इच्छा आहे--तू एक पोरगी घेऊन ये, मग तुझ्याकडं काही दिवस आरामात राहीन म्हणते... "

मी जोरानं ओरडलो, " जरा कुठं स्वस्थ बसेन म्हटलं तर कुणी साधं स्वस्थ बसूदेखील देत नाही. पात्तुम्मा ! आनुम्मा ! या अशा इकडं. या चटकन ! चला माझं सारं सामानसुमान काढा. बॅग-बेडिंग कुठाय्...बोलवा एक कुली आत्ताच्या आत्ता... "

दोन्ही बहिणी धावतच आल्या. आनुम्मानं ह्यामागचं कारण शोधायला सुरुवात केली-- " उम्मा काय झालं ग ? "

पात्तुम्मा म्हणाली, " भाईजानकडं उम्मानं पैशाची मागणी केली असणार, दुसरं काय ! "

मी तावडतोब तिचं म्हणणं मोडून काढलं. म्हटलं, " नाही, अशातलं काही नाही. "

उम्मा उठली अन सरळ परसदारी निघून गेली. दोन्ही बहिणी " काय झालं उम्मा ? " असं विचारीत विचारीत तिच्या पाठोपाठ गेल्या.

थोडी स्वस्थता लाभली. मी तसाच बसून राहिलो न आनुम्माकडून कपभर चहा मागवून घेऊन प्यालो. बिडी शिलगावून एकदोन झुरके घेतले. तेवढ्यात लक्ष गेलं-- पाहतो तो काय -- पात्तुम्माची शेळी अंगणात उभी राहून गारे जीभ लांब लांब

१. सलूका--लांब बाह्यांचा कमरेपर्यंतचा अंगरखा--लांब बाह्यांचे पोलके.

करून काड्याची पेटी खाण्याचा प्रयत्न करतेय. आत्ता थोड्या वेळापूर्वी ती पेटी ओसरीवर मी अगदी माझ्याजवळच ठेवली होती. मी तिच्यातून काड्या काढून घेतल्या अन रिकामी पेटी शेळीला खायला देऊन टाकली. मोठ्या चवीनं शेळी ती खाऊ लागली. खाऊन झालं तरी ती आपली तिथं उभीच. तसं मी म्हटलं, " हे अजसुंदरी ! काड्या मला हव्या आहेत. रिकाम्या पेट्या आणखी शोधून देईन. " तेवढ्यात पात्तुम्मानं तिला तांदुळाचं धुवण आणून दिलं. मी पात्तुम्माला म्हटलं, " पात्तुम्मा, तुझ्या शेळीनं माझी दोन पुस्तकं खाऊन टाकलीत. "

जणू काही मी फार भयंकर आरोप केलाय अशा थाटात पात्तुम्मानं उत्तर दिलं, " असं म्हणू नका भाईजान ! माझी शेळी असलं काही करणं मुळीच शक्य नाही ! " मग ती हळूच म्हणाली, " ती कानांतल्या फुलांची गोष्ट... ? "

" आहे, लक्षात आहे... " मी त्याच स्वरात उत्तर दिलं.

" कुणाला समजता कामा नये... " आवाज आणखी खाली आणीत स्वयंपाक-घराकडं जाता जाता ती पुटपुटली.

रषीद आणि सुबैदा रडत होते. त्यांना सहानुभूती दाखवावी म्हणून अरीफा, सैदू मुहम्मद आणि लैला या तिघांनीही एकसाथ रडायला सुरुवात केली. रडता रडता लैला मध्येच थांबायची, फुरंगटून म्हणायची, " अम्मीला नाही नेणार आम्ही. " तेवढ्यात अबू एक पत्र घेऊन आला. मला पत्र दिलं अन एक काठी हातात घेत आरडाओरडा करीत आत गेला— " वा: क्या बात है ! " साऱ्यांचं रडणं-गागणं एकदम बंद. सारं घर कसं एकदम शांत झालं. निवांत झालं — नीरव झालं.

मी पाकीट फोडून पत्र वाचलं. दूर मद्रासहून आलं होतं ते पत्र. राजश्री एम्. गोविन्दन्च्या पत्नीनं— डॉक्टर पद्मावतीनं —एका पुत्ररत्नाला जन्म दिला आहे. बाळबाळंतीण सुखरूप आहेत. आई-बाळांना शुभेच्छा व्यक्त करणारं एक पत्र मी ताबडतोब लिहून टाकलं. ' वाला 'ला एक धाकटा भाऊ मिळाला म्हणून त्याचंही अभिनंदन केलं. त्याच्या बापाला सल्ला दिला की बाळाला त्याची सारी संपत्ती — अवघे अडीच रुपये — नीट बँकेत बंदोबस्तात ठेवायला बजाव. श्री. एम्. गोविन्दन् यांनी दुसऱ्यांदा हे महान पितृपद प्राप्त केल्याबद्दल त्यांच्यावरही स्तुतिसुमनांची वृष्टी केली. त्याचबरोबर हेही लिहिलं की एम्. नारायणन् नंपियार, एम. ए., के. सी. एस. पाणिक्कर, डेव्हिड जॉर्ज, जानम्मा, पास्कुट्टियम्मा, के. ए. कोडुङ्ङल्लूर, के. पी. जी. पणिक्कर (गोपकुमार), शरतकुमार रामजी, आर. एम्. माणिक्कन्,

वगैरे मद्रासमधील मित्रांची गाठभेट झाली तर मी त्यांची चौकशी केली, कुशल विचारलंय म्हणून सांगा अन म्हणावं की मी सध्या आपल्या आईकडंच रहातोय. पुनश्च एकवार आई-वडील अन मुलं यांना शुभेच्छा व्यक्त करून पत्र पुरं केलं. पत्र पाकिटात बंद केलं अन पाकिटावर पत्ता वगैरे लिहून होताच अबूला हाक मारली. म्हणालो, " हे ताबडतोब पोस्टात टाकून ये. "

त्याला हे सांगत असतानाच एक गोष्ट आठवली. मी म्हटलं, " थांब जरा तुझ्यासंबंधी बऱ्याच कागाळ्या ऐकतोय आजकाल. तू अब्दुल खादरच्या दुकानातनं हाताला लागतील ते सारे पैसे वाटेल त्यांना उसने देत असतोस. वाटेल त्या मासिकांची एजन्सी घेऊन ठेवलीयस. कुणाला धूप घालीत नाहीस. कुणाचं काही ऐकत नाहीस. काय, खरं आहे हे सारं ? "

साऱ्या आरोपांचं त्यानं एका वाक्यात उत्तर दिलं-- " साऱ्यांनाच मी नकोसा झालोय... "

मी आणखी काही बोलायच्या आतच तो म्हणाला, " भाईजान आले तेव्हापासूनच पहा--- थोरल्या बहिणी, भावजया, उम्मा, सर्वांनी मिळून अंगण अन घर चारी दिशांनी झाडूनलोटून साफ केलं -- केरकचरा एकत्र गोळा करून जाळून टाकला. त्याआधी मी किती वेळा यांच्या कानीकपाळी ओरडलो असेन, पण ह्यांना ढिम् नाही-- कुणी कसली पर्वाच केली नाही माझ्या सांगण्याची. उलट मलाच वर सल्ला : ' हवं तर स्वत: झाड हाती घ्या अन करा काय साफसफाई करायची असेल ती !' अन मग आता कसं ? बास. भाईजानकडनं पैसा लाटायला मिळायची आशा आहे ना. पैसेवाला आला तर त्याला खूश करण्यासाठी लागले सारे धडपडायला अन धावपळ करायला. मी थोडाच पैसेवाला आहे ! माझ्यापाशी पैसाअडका कुठं आहे ... ! भाईजान ! आपण हे अंगण पक्कं चोपून घेऊ अन घरावरची झावळं काढून टाकून जरा कौलारू छप्पर बनवू या..."

" मी विचारलं-- " याचा अर्थ ?"

" भाईजान पैसे द्या. मला कुठून मिळणार पैसे ?"

जेवण आटोपून पत्र घेऊन तो निघून गेला. तो दुकानावर पोचल्यावरच अब्दुल खादरला घरी यायला मिळणार. तो जाताच हनीफा आला.

हनीफा लष्करात होता. ते सुटल्यावर त्यानं शिपीकाम सुरू केलं; जोडीला एक सायकलचं दुकानही सुरू केलं. तो जरा कपड्यालत्त्यांचा शौकिन आहे. लांबरुंद धोतर, झब्बा, गुळगुळित दाढी केलेला मुखडा; नीट विंचरून चापूनचोपून बसवलेले

चमकदार केस — ही आहे त्याची वेश-भूषा. आत्ता मात्र त्यानं एक साधीशी लुंगीच पेहनली होती. काहीतरी गोष्ट नक्कीच आहे. मी आपला उगा राहिलो ... यदाकदाचित काही बोललो चुकून तर...

पण त्यानंच सुरू केलं, — " भाईजान, मी माझी जमीन विकायचा विचार करतोय... आपल्याला स्वस्तात देईन— कमी किंमतीत देईन—"

" आता कशाला विकतोयस ?"

" पैसा नाही हातात. असता तर एखादा सदरा शिवून घेऊन नसता का वापरला ? "

" काय अपेक्षा आहे तुझी जमिनीच्या किंमतीची ?"

" भाईजान, आपल्याला स्वस्तात देईन... दहा हजार देऊन टाका. "

दहा हजार रुपये ! हनीफाने त्या जमीनीची काय किंमत दिली होती, ते मला माहीत होतं. मी विषय बदलला अन विचारलं. " हल्ली तू घरात खर्चासाठी किती देत असतोस ?"

दोन-तीन वर्षांपूर्वी तो देत असे— दोन आणे— दिवसाकाठी दोन आणे. त्याची बायको, दोन मुलं अन तो स्वतः, सर्वांच्या खाण्यापिण्याच्या वगैरे साऱ्या खर्चासाठी हे दोन आणे होते! कुणासाठीही त्यानं गाद्या केल्या नाहीत. तेल-साबणही कधी आणलं नाही. ते सारं तो या एका चवलीवर भागवायचा. अब्दुल खादर त्याला प्रसंगी दोन भलेबुरे शब्द सुनवायचा, पण ह्याला त्याची थोडीदेखील लाजलज्जा नसायची. जरा अधिकउणं बोललं तर फाडकन् म्हणायचा, " ठीक आहे तर, मी आपला पुन्हा लष्करातच जातो कसा ! सरकारला माझी जरुरी आहे.

त्या वेळी माझ्या मध्यस्थीमुळे थोडा समझोता घडून आला होता. तो चवली-वरून पावलीवर आला. पुढे हलकेहलके पावलीचे बारा आणे झाले. पण लोक सांगतात, मी बाहेरगावी जाताच तो फिरून त्याच चवलीवर येऊन ठेपला. आता त्याला आणखी एक मुलगा झालाय. ह्यासाठी त्याच्याकडून जादा पैसे देवविण्याला एक न्याय्य कारण मिळालं आहे. पण त्यानं माझ्या प्रश्नाचं उत्तरच दिलं नाही. म्हणाला, " छोटया भाईजानच्या जुलमापायी जगणंही मुश्किल झालंय. "

" काय, अब्दुल खादरनं काय जुलूम केलाय असा ? "

" नोटांचं एक बंडल घेऊन माझ्या दुकानात आले. बरीचशी प्रतिष्ठित माणसं दुकानात बसलेली होती त्या वेळी. सर्वांच्या समक्ष त्या नोटा माझ्या तोंडावर मारीत म्हणायला लागले, " पाहून घे नीट, फेकलेला पैसा पैसा खेचून आणतो, समजलं ? "

अन मग लंगडत लंगडत निघून गेले. शरमेनं मी चूरमार झालो. जमीनदोस्त झालो. " मी रोज आपल्याला विडीकाडी नाही विकत आणून देत ? माझा पैसा खर्च होऊनही मला पैसा का मिळत नाही ? माझा फेकलेला पैसा पैसा खेचून का नाही आणीत ? "

हे सारं म्हणणं तसं न्याय्य होतं, ठीक होतं -- पण मी जे विचारलं त्याचं ते न्याय्य उत्तर नव्हतं -- " आता तर रपीदही आहे ना ? तू घरात रेशन्ससाठी काय देतोस ? "

त्यानं ताडकन उत्तर दिलं, -- " मी लष्करात चालता होतो. सरकारला माझी जरुरी आहे -- "

रागारागात तो आतल्या घरात गेला अन जेवूनबिवून दुकानावर सटकला.

मी जेवायला बसलो तशी पात्तुम्माची अजसुंदरी सहभोजनाच्या पवित्र्यात मला खेटून उभी राहिली. ताटात तोंड घालणंच काय ते बाकी उरलं होतं ! मी ओरड-लोच, " पात्तुमा, धाव लौकर. "

पात्तुमा धावत आली अन शेळीला चुचकारीत अंगणात घेऊन गेली.

मी म्हटलं, " दोरीनं बांधून टाक तिला नीट. "

पात्तुम्मानं त्यावर उत्तर दिलं, " बांधून घेणं आवडत नाही तिला, भाईजान ! "

रात्र पडली तशी कोच्चुण्णी आला. तो कधीकधी वस्तीला आमच्याच घरी राहतो. रात्री वस्तीला असला की माझ्याजवळच झोपतो. माझ्या एका बाजूला उम्मा, कोच्चुण्णीच्या पुढचात अबू. शेजारच्या खोलीत हनीफा अन त्याची बायको-मुलं. आतल्या खोलीत अब्दुल खादर सकुटुंब सपरिवार. पडवीत गोणपाटाच्या पडद्याआड सुलेमान अन त्याची बायकोमुलं. ज्या दिवशी कोच्चुण्णी आमच्या घरी रात्री झोपायला रहात नाही, त्या दिवशी मिरवणुकीनं तो आपल्या घरी जातो. नारळाच्या पानांच्या छिलटयाची मशाल[1] पाजळून तो पुढं पुढं चालतो. त्याच्या मागं पात्तुम्मा, पात्तुम्माच्या पाठीशी तिच्या शेपटासारखी घोटाळणारी तिची दशवर्षीय कन्यका खदीजा अन अगदी सर्वांत शेवटी शेळी. अशी असते एकंदरीत त्याची शोभा-यात्रा म्हणजेच आपली मिरवणूक.

---

१. केरळमध्ये आजही गोरगरीब नारळाच्या पानांच्या छिलटाची चूड ( मशाल ) रात्री अपरात्री इकडे तिकडे जाण्यासाठी वापरतात.

# २

पात्तुम्माच्या बकरीचा खट्याळपणा सकाळी सकाळीच सुरू झाला. आठ एक वाजले असावेत. अंगाला, डोक्याला तेल वगैरे चोळून मी व्यायाम करीत होतो. तेवढ्यात अंगणात चाललेला पोरांचा आरडाओरडा ऐकू आला :

" उल्लाटत्तिपारू ! उल्लाटत्तिपारू ! "

" शेपटी पकडा ! शेपटी पकडा. "

काय प्रकार आहे ? मी खिडकीतनं पाहिलं. विशेष असं काही नव्हतं. पात्तुम्माच्या शेळीनं अबीच्या हाफ्पॅन्टच्या पुढचा सारा भाग खाऊन टाकला होता अन उरलेला तिनं आपल्या तोंडात घट्ट धरून ठेवला होता. अबीनं तिचा गळा पकडला होता. पात्तुक्कुट्टी तिची शेपटी धरून खेचीत होती. सैदू मुहम्मद शेळीच्या शिगांना भिडला होता. अरीफा भेदरून एका बाजूला उभी होती. रषीदा अन सुबैदाचं ह्या कशातच कुठं लक्ष नव्हतं. ते आपले अंगठे चोखीत अंगणात स्वस्थ बसले होते. लैला शेळीच्या पोटाला मिठी मारून तिला शिव्या देत होती...

" उल्लाटत्तिपारू ! उल्लाटत्तिपारू ! "

मी टॉवेल गुंडाळून खोलीतनं पडवीत आलो, अंगणात गेलो अन शेळीचा कान पकडीत अबीच्या कचाट्यातनं तिची सुटका केली. शेळीनं अबीच्या हाफपॅन्टचा नुसता पुढचाच भाग खाल्ला होता असं नव्हे, तर तिनं एक खिसाही खाऊन टाकला होता.

आणखी जरा चौकशी केली तसं समजलं की ह्यात पात्तुम्माच्या शेळीचा काही-एक दोष नाही. अबीच्या पॅन्टच्या खिशात काहीतरी खाद्य पदार्थ होता. त्यातलं थोडंसं त्यानं शेळीला दिलं. बाकी सारं पॅन्टच्या खिशात खोचून तिच्या समोर जाऊन उभा राहिला अन खिसा म्हणाला, " खा. " शेळीनं ते झटकन सारं खाऊन टाकलं अन पॅन्टच्या खिशात जे काही होतं त्याच्यासकट खिसा खाऊन टाकला. अबी म्हणाला, " बाप्पा मारतील. "

" का, पहिल्यांदा शुद्ध नव्हती ? आता खा मार. " क्षणभरानं मी म्हटलं, " भ्यायचं काही कारण नाही. बाप्पाला कुणीही सांगणार नाही. "

पात्तुक्कुट्टी, लैला अन सैदू मुहम्मद यांना ही गोष्ट गुप्त ठेवायची सूचना दिली. लैलालाही सांगितलं की यापुढं कुणालाही 'उल्लाटत्तिपारू' म्हणून चिडवायचं नाही.

व्यायाम आटोपून मी स्नानासाठी नदीवर जायला निघालो... तसं सैदू मुहम्मद

अन पात्तुक्कुट्टीलाही बोलावणं धाडलं. पण त्यांच्याबरोबर अबी अन लैलाही आले. ती दोघं मात्र आपल्या बापाबरोबर आंघोळीला गेली नव्हती. माझी वाट पहात थांबली होती. कारण काही खास नव्हतं. लैलानं अबीची दगडी पेन्सिल मोडून टाकली, म्हणून बाप्पानं त्या दोघांनाही आपल्याबरोबर आंघोळीला नेलं नव्हतं. पात्तुक्कुट्टी अन अबीला दगडी पेन्सिल विकत आणायसाठी हनीफानं तीन पैसे देऊन ठेवले होते.

मी सगळ्यांना नदीवर घेऊन गेलो अन त्यांना नीट आंघोळपांघोळ घालून काठावर आणून सोडलं. त्यानंतर मी स्वतः पोहायला, मनसोक्त डुबक्या घेत घेत आंघोळ करायला सुरुवात केली. तोच अबीची हाक कानांवर आली, "बडे चचाजान!" मी वळून पाहिलं. पाण्याबिण्यात कुणी उतरलं नव्हतं. पोहत पोहत मी घाट गाठला. विचारलं, "काय रे, काय आहे ?"

अबी म्हणाला, "माझी पॅन्ट नाहीये..." त्याच्या ह्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट होता. माझ्याजवळ लज्जारक्षणार्थ काहीही नाही, असं नागवं नागवं रस्त्यानं कसं जायचं ?

मी विचारलं,--"अरे, येताना तर तू असाच आला होतास ना ?"

ते सारं ठीक होतं — पण आत्ता आत्ता अबीनं आपल्या एका वर्गबंधूला नावेतनं नदीपार करताना पाहिलं होतं. अन तो लुंगी नेसला होता. म्हणून मग मी अबीला लज्जारक्षणार्थ एक टॉवेल देऊन टाकला. ते पाहताच पात्तुक्कुट्टीलाही लाज वाटायला लागली. तिलाही काही नेसायला हवं होतं.

मी आंघोळ आटोपून आपले कपडे केले अन दुसरा टॉवेल धुऊन पात्तुक्कुट्टीला गुंडाळायला दिला.

लैला अन सैदू मुहम्मदची वयं अजून लाजेची जाणीव व्हावी इतपत झालेली नव्हती. आता त्यांनाही जर काही कुठं लाजबीज वाटू लागली असली तर मात्र माझी पंचाईतच होती ! माझ्याजवळ तर फक्त दोनच टॉवेल होते.

घरी येऊन पाहतो तो अब्दुल खादर अन हनीफाचं जंगी वाग्युद्ध चाललेलं. कारण दुसरं काही नाही, काल रेशन आणण्यासाठी हनीफानं घरात काहीही दिलं नव्हतं. ही गोष्ट अब्दुल खादरच्या कानांपर्यंत पोचली, ते हनीफाला आवडलं नाही. एवढ्याचसाठी तो आज बायको-मुलांसह घर सोडून जायच्या तयारीत होता.

"चल नीघ, ऐशोम्मा." हनीफा आरडाओरडा करीत म्हणाला, "पोरांनाही हाका मार."

तो अन त्याची मुलंबाळं त्याच्या केळीच्या बागेत एखादं खोपटं बांधून रहातील. मी पाहिलं, तो नेसला होता ती लुंगी माझी होती. मी जवळ जाऊन विचारलं तर, "आता काही बोलाय-ऐकायला वेळ नाही, फार कामं पडलीत, असं म्हणत तरातरा आपला पुढंच निघून गेला -- उंबरठ्याबाहेर पाऊल टाकीत म्हणाला, "ह्या घरात मला कसला काही हक्क अधिकारच उरलेला नाही."

हनीफा आपल्या शिवणकामाच्या दुकानी चालता झाला. मी अब्दुल खादरला विचारलं, "काय रे, ह्या आरडाओरडीच्या जंजाळातून माझी सोडवणूक नाही का करता येणार तुला ? जागा खाली करण्यासाठी त्या इन्स्पेक्टरला का नाही विचारीत पुन्हा एकदा ?"

अब्दुल खादरनं उत्तर दिलं, -- "इथं आपल्याला काय कमी आहे ? तेल, साबण, दूध, तूप, चहापाणी, विडी, माचिस, फळं, टोमॅटो, तऱ्हेतऱ्हेची केळी, सारी काळजी वहायला, हवं नको पहायला उम्मा, मी, अबू, कोच्चुणी, आम्ही सारेच्या सारे; आणखी काय हवंय आपल्याला ?"

अब्दुल खादर एके काळी शाळामास्तर होता. मोठा वैय्याकरणी -- भाषापंडितही. फार पूर्वीची गोष्ट आहे. एक दिवस तो उम्माला म्हणाला, "मातुश्री, थोडं शुद्धोदक देण्याची कृपा कराल काय ?" त्यावर उत्तरादाखल उम्मानं भात वाढण्याचा डाव त्याच्या अंगावर भिरकावला होता. बाप्पांनी सांत्वनादाखल त्याला म्हटलं, "तू तिला अशीच हाक मार बेटा ! अन मला काय हाक मारशील ?"

"पिताश्री !"

उम्मानं त्यासरशी ही एक ठेवून दिली त्याच्या मुस्कटात. तेव्हापासून तो 'उम्मा' अन 'बाप्पा' असंच संबोधीत आला आई-बाबांना -- लंगडा कुठचा !

मला अन त्याला एकाच दिवशी शाळेत घातलं होतं. तेव्हा ते मुस्लिम स्कूल होतं. उंपियण्णन नावाच्या एका भक्तानं उभारलेलं.

पुतुश्शेरी नारायण पिल्ला सर हे तिथं आम्हांला पहिल्या इयत्तेला शिक्षक होते. आम्हांला 'अ - आ' लिहा-वाचायला त्यांनीच शिकवलं. अब्दुल खादरची शाळेत थन बाहेर गुंड म्हणून ख्याती होती. अत्यंत सालस मुलगा म्हणून शाळेत सारेजण मला नावाजत. नारायण पिल्ला सर त्याला खूप चोपायचे.

अब्दुल खादर डाव्या पायावर सावरून उभा रहायचा अन गर्रकन वळून उजव्या पायानं मुलांना जोरात तडाखा हाणायचा. मलाही त्यानं असाच मार दिला होता कधीकधी. आपल्या उजव्या पायाचा तळवा थेट नाकासमोर आणायचा अन विचा-

रायचा, " असं करता येतं तुला ?" नाही. कसं कोणाला करता येईल ते! सर्वांचेच पाय त्याच्यासारखे ढिलेपणानं लळतलोंबत थोडेच असतात! त्याच्यासारखी सर्कस कोणालाच करून दाखवता यायची नाही.

नाही येत ? तर मग हुंगून पहा माझ्या पायाचा तळवा --" त्याच्या लंगड्या पायाचा तळवा दुसरे हुंगून कोण पहाणार ? कोणी हुंगून पाहिलं नाही तर हा ठोसा मारायचा. मुलं त्याच्यापासून लांब जाऊन उभी राहिली तर हा छाती पिटून जोर-जोरानं रडायला लागायचा. लंगडा असल्यामुळं लोकांच्या मनात साहजिकच त्याच्या-विषयी दया-सहानुभूती असायची. तिचा तो मनसोक्त फायदा घ्यायचा. तो काहीही करो, अपराधाचं खापर मात्र दुसऱ्यांच्या माथी. त्याचे गुद्दे खाण्यासाठी पोरं बिचारी निमूट उभी रहात. मीही उभा राह्यलो आहे. मी किती ठोसे खाल्ले असतील, त्याची गणतीच नाही. त्याची पाटी अन पुस्तकं मलाच वहावी लागत. मी थोरला होतो ना? खरं म्हणजे धाकट्या भावानं मोठ्या भावाची पाटी-पुस्तकं नेणं---वागवणं न्याय्य झालं असतं; पण इथं मामला उलटा होता. त्याच्या सामानाचं ओझं मला वहावं लागत होतं. नाही तर--ठोसा ठरलेला. !

मी खूप मार खाल्ला, खूप कष्ट उपसले. आतून संतापानं धुमसत असायचो---पण करतो काय ? पाटी अन पुस्तकं रस्त्यावर टाकून तो माझ्या जवळ यायचा अन हात उगारून संथपणं विचारायचा, " माझी पाटी-पुस्तकं घेशील ? " रोजचं उत्तर ठरलेलं, " नाही. "

मग न्याय-अन्यायाच्या गोष्टी सुरू करायचा. " मी तुझा थोरला भाऊ नाहीये ? घेतोस की नाही ? "

" नाऽही ! "

त्यासरशी झटकन एका पायवर स्वतःला सावरीत दुसरा पाय गर्रकन् फिरवून सरळ तडाखा हाणायचा माझ्या छातीवर. मी कोलमडून खाली पडायचो -- तो जरा लांब उभा राहून हुकूम करायचा, " चल उठ उचल ती सारी पाटी-पुस्तकं. पोचायला उशीर झाला तर ' सर ' मार देतील. "

मी पडल्या पडल्या व्यथित मनानं विचार करायचो -- हा कुठला न्याय आहे ? धाकट्या भावानं ठोसा मारावा, अन थोरल्या भावानं ते निमूट सहन करावं. वर पुन्हा त्याच्या पाटी-पुस्तकांचं ओझंही वहावं. मी तसाच पडून रहायचो. असं झालं की तो माझ्या छातीवर बसायचा अन विचारायचा, " काय, आणखी गुद्दा हवाय काय ? " मी पराजित होत्साता म्हणायचो, " नाही-नको-नेईन मी सारं काही --"

मी उठायचो अन त्याची पाटी-पुस्तकं उचलून चालू लागायचो. असे किती दिवस ! किती ठोसे !

एक दिवस मला एक युक्ती सुचली. त्यानं गुद्दा लगावण्यासाठी हात फिरवायच्या आधीच त्याच्या चांगल्या पायावर मी एक व्यवस्थित लाथ हाणली अन तो चारी-मुंड्या चीत, जमीनदोस्त. झटकन मी त्याच्या छातीवर स्वार होऊन बसलो. परंतु जणू काही माझ्या हातून हा काही फार घोर अन्याय झाला आहे अशा थाटात त्यानं मला विचारलं, " हे काय ! मी धाकटा भाऊ नाही का ? माझ्या छातीवर असं बसणं योग्य आहे वाटतं ?"

एक ठोसा ठेवून द्यावा म्हणून मी हात उगारला तर रडत रडत तो म्हणाला, " मला गुद्दा मारू नका—भाईजान, मी तुमचा धाकटा भाऊ आहे. "

" धाकटा भाऊ ! हूं ! आधी का नाही कळलं तुला ?"

" आता मी रोज लक्षात ठेवीन. "

" लेका, कुत्रं दृष्टीला पडताच त्याला दगड कोण मारतं अगोदर ? "

" भाईजान. "

" नदीत आंघोळ करताना बुडी मारून पैल तीराला कोण अगोदर पोचतं ?"

" भाईजान. "

" घरातनं काही चोरलं तर तुला अगोदर कोण देतं ? "

" भाईजान. "

" नारा पिल्ला सरांच्या टेबलाच्या खणातनं खडू काढून कोण देतं तुला ?"

" भाईजान. "

" तर मग ?"

" ह्यापुढं भाईजानची पाटी अन पुस्तकं घेऊन मी जात जाईन. "

" लेका ! तू आपली स्वतःची नेलीस तरी पुरे आहे. "

" तर मग पुढं कोण चालेल ?"

" मी. "

त्या दिवसापासूनच अब्दुल खादर धाकटा भाऊ झाला....लंगडा कुठचा !

" ऐकलंस का माझं ?" मी म्हटलं, " तू त्या इन्स्पेक्टरला घर खाली करायला का नाही सांगत ? ह्या घरातल्या गडबडगोंधळानं अन आरडाओरडीनं माझ्या नाकी दम आलाय. कधी लक्षात येणार हे सारं तुझ्या ?',

" भाईजान तो गृहस्थ सारखा घराच्या शोधातच आहे. एक्साईजवाले पण

शोधताहेत. जरा आणखी थोडे दिवस थांबा. "

तो आपली लोखंडी छडी खटखटावीत लंगडत लंगडत निघून गेला. मी एक अननस अर्धं कापून साल काढीत होतो, तेवढ्यात पात्तुम्माची शेळी खिडकीपाशी अन पोरं दरवाजत हजर झाली.

केळं, तूप अन पुट्टू[१] मिळून एक-एक घास मी सगळ्या मुलांना द्यायचो. अननसाचा एक-एक तुकडाही द्यायचो, हे सारं मिळालं की पोरं दंगा करायला दुसरीकडं निघून जायचे. पण अबी, पात्तुक्कुट्टी, लैला, अरीफा, खदीजा ह्या सर्वांना चुकवून आनुम्माचा मुलगा सैदू मुहम्मद माझ्या समोर दिसतो न दिसतो अशा थाटात खांबाआड गुपचूप उभा रहायचा. त्याला मी एक वाटा ज्यादा द्यायचो.

खाणं वगैरे आटोपून केळी-अननसांच्या साली पात्तुम्माच्या शेळीला द्यायचो, अन मग चहाचा पेला घेऊन ओटीवरच्या खुर्चीवर येऊन बसायचो. शाळेतले विद्यार्थी त्या रस्त्यानं घरी जाताना दिसायचे. तीच वेळ असायची ही. नेहमीच त्या मुली जणू माझ्याकडं पहात पहात जायच्या. त्यांच्या त्या पहात जाण्यामागचं रहस्य नंतर समजलं. ते मग पुढं सांगेन.

त्या दिवशीही रोजच्याप्रमाणं अबी अन पात्तुक्कुट्टी शाळेत गेले होते. थोडा वेळ गेला, अबीनं रस्त्याच्या कोपऱ्यावरून गुपचूप हातानं खूण करून मला बोलावलं.

काय झालंय ? मी उठून तो होता तिथं गेलो. पात्तुक्कुट्टी एका नारळीच्या आडोशाला लपून बसली होती. मी तिथं पोहचताच अबी म्हणाला, " चचाजान, बाप्पांनी पाटीवरची पेन्सिल घ्यायला अर्धा आणा[२] दिला होता ... "

" अर्धा आणा ? "

" पॅन्टच्या खिशात ठेवला होता. "

" काय म्हणतोयस ? "

" शेळीनं खाल्ला ना त्याच खिशात होता बघा..."

" अस्सं ! पात्तुम्माच्या शेळीनं पैसेही खाऊन टाकलेन तर ! "

---

१. तांदळाची पिठी आणि नारळ एकत्र करून बनविलेला एक खाद्य पदार्थ. गरीब लोक तांदळाच्या पिठाऐवजी कसावा ( टॅपिओका ) चे पीठ वापरतात. त्यांना 'कप्प पुट्टू' अर्थात कसावाचे पुट्टू म्हणतात.

२. केरळमध्ये पईला पैसा म्हटले जाते. याचाच अर्थ तीन पयांचा एक पैसा आणि असे दोन पैसे म्हणजे अर्धा आणा हा आपला जुना दशमान पद्धतीपूर्वीचा हिशोब ध्यानी घ्यावा.

मी म्हटलं, " अच्छा, ही गोष्ट कुणाकुणाला सांगू नका हं तुम्ही. बघतो करून पैसे मिळतात का ते -- "

अबी म्हणाला, " आजी पाहील तर मारील. जरा लपून उभा रहा. "

मी पात्तुम्माकडून दोन आणे उसने घेतले अन अबी अन पात्तुक्कुट्टीला अर्धा आणा देऊन शाळेत धाडलं.

पात्तुम्माची शेळी अंगणातच उभी होती. कोणत्याही क्षणी तीन-तीन पैशांची दोन नाणी पडतील असं वाटलं--म्हणून मी वाट पहात बसलो; पण तसलं काहीही घडलं नाही. माझे डोळे शेळीच्या मागंमागंच भिरभिरत होते.

एवढ्यातच माझ्याकडं औत्सुक्यपूर्ण नजरेनं पहाणाऱ्या विद्यार्थिनींचा एक तांडाच्या तांडा रस्त्यावरून जाऊ लागला. मी खूष झालो -- म्हणजे मी कोण ते त्यांना माहीत आहे तर ! उगाच का त्या अशा पहातात माझ्याकडं ? आपपसांत त्या अशा प्रकारचं काही बोलतही असणार (लक्षात ठेवा, माझी आपली फक्त ही कल्पना आहे हं)

कुरळ केसवाली --आरामखुर्चीत बसलेले ते गृहस्थ कोण आहेत, माहीत आहे ?

हरिणाक्षी -- माहीत नसायला काय झालंय ? ते तर ख्यातनाम साहित्यिक-- वैकं मुहम्मद बषीर आहेत.

कोकिळकंठी --माझ्या आटोग्राफ बुकात त्यांची स्वाक्षरी अन संदेश घेईन म्हणते.

मार्जारनयना — छे: छे: ! ते नाहीत ग ते. खोपटासारखं घर दिसत नाही तुला ?

मधुवाणी —अग जा ऽ ग जा! मांजरडोळ्याची कुठली ! तुला काय समजतंय? होच मुळी, तेच आहेत ते. बघायचंय ? आजच मी माझ्या आटोग्राफ बुकात त्यांच्याकडून संदेश मिळवते...

मार्जारनयना -- हां हां ! घे, खुशाल खात्री करून घे !

त्या दिवशी दुपारचं जेवण आटोपून परतताना त्या साऱ्या आमच्या घरी आल्या. तेव्हा दुसऱ्या एका प्रसंगाची आठवण झाली. त्या वेळी मी दुसऱ्या घरात रहात होतो. मी आल्याचं समजताच हायस्कूलचे हेडमास्तरसाहेब मला भेटायला आले. म्हणायला लागले, " शाळेचं वार्षिक स्नेहसम्मेलन व्हायचंय, त्यात आपण भाषण करावं, मुलांना चांगला उपदेश करावा. "

मी उत्तर दिलं, " मला भाषणं-बिशणं करायचा सराव नाही. अन मुख्य म्हणजे त्या वेळी कदाचित मी इथं नसेनही... "

ते म्हणाले, " कार्यक्रमपत्रिकेत तुमचं नाव छापतो. आपण इथं असलात तर अवश्य या. "

कार्यक्रमपत्रिकेत नाव प्रसिद्ध झालं. आता काय करू ? जरा स्वस्थ निवांत राहून काही लिहावं म्हणून आलेला माणूस मी. हे असंच काहीबाही विचार करीत मी बागेत झाडाझुडपांशी उभा होतो -- तेवढ्यात गजातनं दृष्टीला पडले दोन डोळे. काळाकुरळा केशकलाप असलेली एक पोरगी. मी विचार केला, आली असेल कदाचित चमेलीची नाहीतर मोगऱ्याची फुलं मागायला.

विचारलं, " काय आहे ? "

ती म्हणाली, " कार्यक्रमपत्रिकेत आपलं नाव छापून आलंय. आम्हांला भाषण हवंय आपलं -- अवश्य या हं -- याल ना ? "

" त्या वेळी इथं असलो ना, तर जरूर येईन. "

त्यानंतर रोजच ती अन इतर काही मुली फाटकाजवळ उभ्या रहात अन म्हणत, " अवश्य यायचं हं -- ऐकलंत ना ? " पण वार्षिक स्नेहसम्मेलनाच्या आदल्याच दिवशी मी एकाएकी निघून गेलो. पेटी-वळकटी काही बरोबर घेतलं नाही. तसाच मोकळ्या हातानं गेलो. फक्त उम्माला तेवढं सांगितलं. शाळेचं स्नेहसम्मेलन आटोपल्याच्या दुसऱ्या दिवशी परत आलो. त्याच दिवशी ती कुरळ्या केसांची मुलगी अन इतरही मुलींनी येऊन गाऱ्हाणं गात म्हटलं, " काय केलंत हे आपण ? "

मी म्हटलं, " इथं असलोच तर येईन -- असंच म्हटलं होतं ना मी ? "

" फार चांगले गृहस्थ आहात आपण. "

ही त्या काळातली घटना होती.

आज उंबरा ओलांडून आत आलेल्या मुलींच्या घोळक्यात ती कुरळ्या केसांची मुलगी कुठं दिसते का याचा नजरेनं शोध घेत होतो. माझी नजर तिला इथं तिथं धुंडाळीत होती; पण ती नव्हती त्यांत. तेव्हाच्या त्या साऱ्या जणी आता मोठ्या झाल्यात. शाळा सोडून कुठं कुठं गेल्याही असतील. या पोरी काय भराभर वाढतात !

ह्या आलेल्या मुलींच्या आटोग्राफ बुकांत लिहायसाठी म्हणून मी टाकाला हात घालणार तोच विचार केला, थांबावं आपण. वाट पाहू दे जरा यांना.

पोरी आल्या, पण त्यांनी माझ्याकडं मुळीच पाहिलं नाही. त्या सरळ जांभळीच्या झाडाजवळ गेल्या अन उम्माशी काही बोलून तिच्या हाती त्यांनी काहीतरी दिलं. उम्मानं आपल्या साडीच्या पदरात गाठ मारून ठेवलेली बरीचशी जांभळं त्यांच्या हाती ठेवली. त्यातलं एक एक मटकावीत त्यांनी मोठ्या कौतुकानं जांभळीच्या शेंड्या-

कडं पाहिलं. गधडचा कार्टी कुठल्या ! उम्माच्या घाणेरडचा मळकट पातळात बांधलेली ती जांभळं, ह्या पोट्टचा खाताहेत ! ते सारं चालतं त्यांना ! अन ह्या मी इथं स्वच्छ शुचिर्भूत होऊन बसलोय, माझ्याकडं पाहिलं तर काय डोळे फुटतील यांचे ?

जणू काही मी खडबडून जागा होत होतो. सारं काही एकदम स्पष्ट झालं. सकाळी त्या पोरी पहात होत्या ते माझ्याकडं नव्हे !

त्या निघून गेल्यावर, मी उम्माला विचारलं, " त्या पोरींनी काय दिलं ग ? "

उम्मा म्हणाली, " एक आणा. "

" त्या पोरींना काय जांभळं विकत होतीस ? "

" तर नाहीतर काय ? "

" एक आण्याची किती दिलीस ? "

" वीस. "

शाब्बास ! असे कित्येक वीस मी पात्तुम्माच्या शेळीला खाऊ घातले असतील ?

त्या मुलींनी माझ्याकडं न पाहण्यात जी एक प्रकारची तुच्छता स्पष्टपणं दर्शविली; त्यामुळं माझ्या विचारचक्राला गती प्राप्त झाली. मी उम्माला विचारलं, " ते जांभळीचं झाड कुणी लावून वाढवलंय ? "

उम्मा म्हणाली, " तूचं तर तलियावकलहून आणून लावलं होतंस. "

तलियावकल नावाचं एक घर आमच्या शेजारीच आहे. तिथं तोम्मन, मात्तनकुञ्ञू, कुंञ्जप्पन वगैरे माझे मित्र रहातात. त्याच घरून मी ह्या जांभळीचं रोपटं आणलं होतं. मी ते लावलं, रुजवलं अन आज एवढं मोठं वाढवून फळाफुलाला आणलंय अन तरीही ह्या गधडचा माझ्याकडं साधं पाहतदेखील नाहीत ! मी उभा रहात उम्माला म्हटलं, " चल तो आणा मला दे. " उम्मानं लगेच तो मला देऊन टाकला. मी जाऊन विडचा विकत घेतल्या अन समुद्रकिनारी जाऊन बसलो. ज्यांनी माझ्याकडं पाहिलंदेखील नाही त्या पोरींची आठवण काढीत, विचार करीत धूर काढीत राहिलो.

त्यानंतर पोरी रोज माझ्या जांभळांच्या झाडाकडं पहात. त्याला जांभळं नुसती लहडली होती. मी स्वतःशीच म्हणायचो -- " पाहून घ्या गधडचांनो ! माझं जांभळांचं झाड आहे. मी लावलं होतं. ... गाढवी कुठच्या ! "

यांचा सूड कसा घेऊ ? खुर्चीवर बसल्या बसल्या वाट पहायचो. खोलीत जाऊन झोपायचोदेखील नाही. काही दिवस असेच गेले अन मग एक दिवस त्या आल्या मी उठलो अन जरा उद्धटपणानंच विचारलं, " काय हवंय ? "

" सहा पैशांची ...... — "

" आणा पैसे — " पैसे घेतले अन खिशात टाकले. मग निवडून निवडून दहा लहान लहान जांभळं दिली.

" हे काय ? ही तर अगदीच छोटी छोटी आहेत. ती म्हातारी तर मोठी मोठी जांभळं द्यायची ? "

" त्या म्हातारीचा ह्या जांभळांच्या झाडावर कसला काही हक्क, अधिकार नाही. म्हणून ती तसं करायची. "

" बरं, तर मग आणखी एक तरी जादा द्या ! "

" ह्या झाडासाठी कष्ट उपसणाऱ्याला हे मान्य नाही — " मी एकही जांभूळ अधिक दिलं नाही.

" काय लोक आहेत ! " असं म्हणत त्या हावरट पोरी निघून गेल्या. माझ्याकडं पाहिलं तर डोळे फुटतात यांचे, अन माझ्या जांभळांच्या झाडाकडं मात्र खुशाल निलाजऱ्यासारख्या पहातात !

अशा प्रकारे मी जांभळं विकली की उम्मा येऊन पैसे मागायची. " का बरं ? तुमचा काय हक्क आहे या झाडावर ? हे माझ्या घामाचं फळ आहे — माझा घामच जणू जांभूळ बनून झाडाला लटकलाय ! तुम्ही आज किती वर्षं ही जांभळं अशी विकलीत ? कुठं आहेत ते सारे पैसे ? "

उम्मा पराभूत होऊन उठून उभी रहायची — तरीही मी तिला तसा सोडायचा नाही — " अन एवढ्यातेवढ्या कारणावरनं पैसे मागतेस हे आणायचंय, ते आणायचंय असं सांगून ! हूंऽऽ ! अन हे चिंचेचं झाड कुणी लावलंय ? "

अंगणात एका बाजूला एक भलं मोठं चिंचेचं झाड होतं. ते खालपासून वरपर्यंत नेहमी हिरव्यागार चिंचांनी लहडलेलं असायचं. उम्मा त्या चिंचादेखील तोडून विकायची, तेही मीच लावलेलं नव्हतं काय ?

उम्मा म्हणाली, " अरे, ते तर तुझ्या वडिलांनी लावलंय. मीही खूप पाणी पाजलंय त्याला. "

" तर मग ह्याच्यावर माझा अधिकार नाही ..." उम्मा रुसून निघून गेली. मी आनुम्माला बोलावून एक पेला चहा आणायला सांगितलं. आनुम्मानं शेजारच्या एका मुलाला सांगून हॉटेलमधून चहा मागवला. चहा प्यालो, बिडी शिलगावली; अन आरामात बसून राहिलो.

सहज लक्ष गेलं — काजळाहूनही काळीकुळकुळित अशी एक मुलगी इकडंच

येत होती. पंधरासोळा वर्षांची असेल. जांभळांसाठीच आली असणार. तीन पैसेवाली की सहा पैसेवाली? गाढवीला छोटी छोटीच जांभळं देईन; पण तिनं झाडाकडं एवढंदेखील पाहिलं नाही -- सरळ माझ्याकडंच आली अन नमस्ते करीत म्हणाली, -- "मी आपल्याला ओळखते. आपली सारी पुस्तकं मी वाचली आहेत. वडिलांकडून समजलं की आपण आला आहात -- म्हणून आले. माझ्या आटोग्राफ-बुकात काही संदेश लिहून आपली स्वाक्षरी द्या."

होय -- माझा मान राखण्यासाठी आलीय ही श्यामल सुंदरी! तुझं मंगल होवो!

मी विचारलं, "तुझं नाव काय?"

"सुहासिनी."

"कोणत्या इयत्तेत शिकत्येस?"

"सहावीत --"

"कुणाची मुलगी तू?"

"हमाल माधवनची मुलगी मी --"

मजुराची मुलगी आहे! कामगारांचा विजय असो! मी खोलीत गेलो, टाक आणला. सुहासिनीच्या त्या स्वाक्षरीसंग्रहात मी लिहिलं, "सुहासिनीस अंतःकरण-पूर्वक शुभेच्छा!" अन मग सही करून तिचा संग्रह तिला परत केला. मग विचारलं, "जांभळं खाशील काय?"

मी एक मोठ्ठा कागद आणला -- मग झाडावर चढून चांगली मोठी मोठी निवडून पन्नास एक जांभळं तोडली अन ती कागदात व्यवस्थित बांधून तिच्या हवाली करीत म्हटलं, "सुहासिनी! हे झाड मी लावलं होतं --"

"अय्या, खरंच!"

"अगदी खरं --"

ती नमस्कार वगैरे करून निघून गेली.

त्या रात्री एक नवीच बातमी ऐकायला मिळाली. पात्तुम्माची शेळी आज उद्या एवढ्यातच विणार आहे! ती गाभण आहे इतकंच नव्हे; तर लौकरच विईलही. ही नवी गोष्ट मला आजवर का बरं नाही समजली? ती गाभण वगैरे असेल असं तर काही जाणवत नव्हतं. कधी तिचं पोट मोठं दिसायचं, कधी ते खपाटीला गेलेलं दिसायचं, गाभण असेल तर मग असं का व्हावं? मी उम्माला विचारलं.

उम्मा म्हणाली, "दिवस भरलेत पुरे तिचे --"

माझा विश्वास बसेना -- विचारलं, "काय, खरं आहे हे?"

# ३

तर, पात्तुम्माची शेळी विणार आहे ! उत्तम गोष्ट आहे -- विओ ! मला आनंद वाटला.

अनुम्मा माझ्या खोलीची झाडलोट करून गादी गुंडाळून बाहेर उन्हात घालीत होती, तेव्हा मी विचारलं, "शेळीला काही खायला वगैरे दिलंस ?"

भाताची पेज दिल्याचं तिनं सांगितलं.

"केवळ पेज देणं पुरेसं नाही. हिरवं ताजं गवत घालायला पाहिजे. नारळाची पेंड विकत आणून पाण्यात मिसळून देणं सर्वांत उत्तम."

हे सांगितल्यानंतर केळ्यांची वगीचशी सालं अन एक छोटंसं केळं शेळीला घालायसाठी आनुम्माच्या हाती दिलं. आनुम्मानं मोठ्या प्रेमानं माझ्या डोळ्यांदेखत ते सारं शेळीला खायला घातलं. पण मला वाटतं की ह्या बायकांचा काही तरी समजुतीचा घोटाळा झालाय, गफलत झालीय. अधिकारवाणीनं बोलणं हा स्त्रियांचा जन्मसिद्ध गुण आहे हे मी मानतो. तरी ही शेळी गाभण असल्याच्या बाबतीत त्यांचा काहीतरी भयंकर गैरसमज झालेला दिसतोय. गोष्ट अशी आहे की माझ्यासमोर जी शेळी उभी आहे ती मुळीच गाभण नाही. तिचं पोट अगदीच सपाट दिसतंय. झाडाखाली पडलेली जांभळं ती खात्येय. जवळच उम्माही आहे. ती पडलेली जांभळं एकत्र गोळा करत्येय.

मोठमोठ्या रक्तवर्गीय हिमबिंदूंप्रमाणं भासणारी जांभळं हिरव्या पानांच्या आड गच्च दडलेली आहेत. माझ्या समोरच, अंगणाच्या एका कोपऱ्यात. मी बसल्या बसल्या हे सारं न्याहाळीत होतो तोच दृष्टीस पडली पात्तुम्मा -- ती इकडेच येत होती. काय आश्चर्य ! तिच्या बरोबरही एक शेळी आहे -- अन खदीजा तर आहेच आहे. पण पात्तुम्माच्या बरोबर आलेली शेळी गाभण आहे.

मी आनुम्माला विचारलं, "ही कुठली शेळी आहे ?"

आनुम्मा म्हणाली, "ही माझी शेळी आहे. इत्ताता[1]नं दिलीय."

म्हणजे आनुम्माचीही एक शेळी आहे ! ती माझ्याच घरात अगदी माझ्या जवळच राहातेय. अन असं असूनही मला मात्र याचा पत्ता नव्हता. दोन वेगवेगळ्या

१. इत्ताता—मुसलमानांच्या बोली भाषेत इत्ताता म्हणजे थोरली बहीण.

शेळ्या आहेत हे अजिबात माझ्या ध्यानीच आलं नाही. दोन्हीही शेळ्या भुऱ्या-फिकट तपकिरी रंगाच्याच आहेत. मी जरा नीट बारकाईनं पाहिलं--पात्तुम्माच्या शेळीच्या डोळ्यांभोवती काळ्या रंगाची वर्तुळं आहेत.

पात्तुम्माची शेळी आल्या आल्याच खोलीत शिरली. मी पात्तुम्माला विचारलं, "काय ग पात्तुम्मा, तू अन शेळी आज इतक्या उशीरानं आलात ती ?"

पात्तुम्मानं खुलासा केला--कोचुण्णी जे काही गवत विकत आणतो ते शेळीला रात्रीचं घालतो--पण तेवढं ने पुरत नाही--म्हणून सकाळी शेतावर जाऊन आणखी गवत कापून आणावं लागलं.

पात्तुम्मा परसदारी गेली...नाराज होऊन वहिणींवर-भावजयांवर गुरगुरू लागली. तिच्या शेळीसाठी भाताची जी पेज ठेवली होती ती फारच थोडी होती.

"आनुम्मानं आपल्या शेळीला पेज घातली त्या वेळी तुम्ही लोकांनी माझ्या शेळीची जरा तरी आठवण ठेवायची! तुम्हांला कसली कशाची आलीय आमची पर्वा ?"

नणंद-भावजयांतली एखादी लठ्ठालठ्ठी ऐकायची मला फार इच्छा होती. सासू-सुनांतली भांडणं कधी ऐकायला नाही मिळाली. नेहमी उम्माचंच तेवढं गडगडणं ऐकू यायचं. खूप दमदाटी करते ती साऱ्यांना.

तर आता आनुम्माचा आवाज कानी आला, -- "मी तर माझ्या शेळीला अगदी थोडी पेज घातली --थोडीशी आम्ही सारे प्यालो -- उरलीय ती राखून ठेवलीय."

मी हे नाही सांगितलं की केळ्यांची सालं मी दिली ती सारी आनुम्माच्याच शेळीच्या पोटात गेली.

"पुरे झालं. आता काही सांगायची जरुरी नाही," पात्तुम्मा म्हणाली, "उम्मालाही मी नकोशीच झालेय -- "

"म्हणजे पहा!" उम्मा म्हणाली, "कसावा[1] उकडून खाल्ल्यावर भाताची थोडीशी तरी पेज प्यावीच लागते. पण आम्ही सर्वांनी घोट घोट तेवढी घेतली असेल. बाकी सारी तुझ्या शेळीसाठीच तर शिल्लक ठेवली होती."

कसावा (टापिओका) खाल्ल्यानंतर भाताची पेज प्यावी लागते -- असं उम्मानं म्हटलं. जरा शोध घेतल्यावर त्यामागचं करुणार्द्र रहस्य ध्यानी आलं. उम्मा, आनुम्मा, कुञ्जानुम्मा, ऐशोम्मा यांपैकी कोणीही भात खात नाही. अर्थात्,

---

१. कसावा = रताळ्याच्या जातीचा कंद—टॅपिओका.

यांच्या वाटचाला भात मुळी येतच नाही. भात पुरुष मंडळीसाठी, मुलाबाळांसाठी आहे. बाकी मंडळी ह्या कसाव्याच्या आधारावरच जीव जगवीत असतात. हे कंद सुकवून साठवून ठेवलेले असतात. सकाळी अकरा वाजायच्या सुमारास हे कंद कुटून त्याचे पुट्टू बनवून खाल्ले जातात. एक चिमूटभर चहाची पत्ती गरम पाण्यात मुरवून बिन दुधाचा, बिन साखरेचा तो चहा ह्या साऱ्या बायका पितात. (ही चहाची पत्तीसुद्धा सुलेमान आपली अशीतशीच देत असणार) अन मग स्वतःला कामाला जुंपून घेतात. सगळ्यांना खूप काम पडतं. पुरुषमंडळी दुपारी जेवायच्या वेळीच घरी येतात. साऱ्या अडीअडचणी, खस्ता काढतात त्या बायका. ही काही केवळ माझ्या एकट्याच्याच घरची गोष्ट आहे अशातला भाग नाही. बहुतेक साऱ्या मध्यमवर्गीय कुटुंबांची हीच रडकथा आहे. बायका एवढ्या मरमर राबतात, सेवा करतात -- पण पुरुषांना आहे का त्याचं काही ?

अब्दुल खादरची बायको कुञ्ञानुम्माचा आवाज कानी आला, "पात्तुम्मात्तात्ता,[1] शेळी व्यालयावर आम्हाला विसरायचं नाही हं. मुबंदासाठी थोडं दूध द्यायचं."

सुलेमानच्या बायकोनं आनुम्मानं म्हटलं, "सेदू मुहम्मदचंही दूध प्यायल्यानं काही नुकसान नाही व्हायचं बरं का --"

आनुम्मा शाळेत थोडं शिकली आहे. पात्तुम्मा थोरली आहे, तरी तिचं शिक्षण बिक्षण काही झालेलं नाही -- म्हणून पात्तुम्माच्या तोंडून झटकन निघून गेलं, "पुरे पुरे ! माहीत आहे तुमची लोकांना नागवायची सवय !"

थोड्या वेळानं मी आपल्या खोलीत गेलो अन पाहतो तो काय -- पात्तुम्माची शेळी आपली मी पेटीवर ठेवलेली मोठाली केळी खात्येय. ती पात्तुम्माचीच शेळी आहे, यात मुळीच संशय नाही. पूर्वेकडच्या दरवाजानं ती आत घुसली असणार -- कारण दरवाजा बंद करायचं आनुम्मा विसरली होती.

मी ओरडलो -- "आनुम्मा, पात्तुम्मा ! धावत या. तुमची ही शेळी माझी मोठाली केळी फस्त करतेय बघा..."

आनुम्मा अन पात्तुम्मा धावत आल्या. आनुम्मा खूष झाली. म्हणाली, "ही तर इत्तात्तांची शेळी आहे."

"जाऊ द्या हो भाईजान !" मध्यस्थी करावी अशा थाटात पात्तुम्मा म्हणाली, "मी दोन केळी आणून देईन तुम्हांला. भुकेलेली असेल बिचारी."

---

१. केरळमधील मुसलमानांत थोरल्या बहिणीला 'इत्तात्ता' म्हणून हाक मारतात. ते जोडूनच 'पात्तुम्मात्तात्ता' हे संबोधन बनवले गेले आहे.

आनुम्मा म्हणाली, "ही शेळी तरी अशी—कितीही खाल्लं तरी तिची भूक काही भागत नाही. माझ्या शेळीचं गवतदेखील ही चोरूनमारून खात असेल."

पात्तुम्माला एकदम फणकारा आला. म्हणाली, "पुरे पुरे ! माहीत आहे तुझ्या शेळीचं गवत मला !"

मी म्हणालो, "असू दे. असू दे. काही हरकत नाही. साऱ्या पोराबाळांना तू तुझ्या शेळीचं दूध देत जा म्हणजे झालं."

"हे कसं शक्य आहे, भाईजान ? कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी करायच्या अद्याप बाकी राहिल्यात ! दूध विकून तर आम्हांला आमच्या घराचा दरवाजा दुरुस्त करून घ्यावा लागणार आहे."

काय करणार ? पात्तुम्मा, कोच्चुण्णी अन खदीजा जिथं राहतात त्या घराचा दरवाजा सध्या कसाबसा दोरखंडानं बांधून ठेवलाय. तो दुरुस्त करून द्यायचाय. मी इथून जायच्या आधी घरातल्या बायकापोरींना निदान एक वेळेला तरी पोटभर खायला मिळेल ह्याची व्यवस्था करायचीय. ह्या साऱ्यासाठी पैसा कुठून आणायचा ? माझ्या जवळ तर एक दिडकीही नाही. जे काही होतं, ते सारं सर्वांना वाटून दिलं. 'वाटून दिलं' वा 'वाटून टाकलं' असं म्हणणं हा झाला आपला एक शिष्टाचार. वस्तुस्थिती अशी आहे की सर्वांनी मिळून माझ्याजवळ होते नव्हते ते सारे पैसे अक्षरश: ओरबाडून घेतलेत. अन आज असं मला लाचार करून सोडलंय.

हे सारं स्मरलं की संताप होतो नुसता. मी काय काय म्हणून दिलं नाही यांना ? भांडी घेऊन दिली, ग्लास घेऊन दिले, बायकांना मस्तक झाकायला नट्टम' (ओढण्या) घेऊन दिल्या. इतकं सारं करूनदेखील यांचं वागणं असं की जणू काही यांच्यासाठी मी काही केलंच नाही !

माझा राग निमित्तालाच टेपला आहे. कुणी जरा इकडचं तिकडं झालं की मी रागवायला, दम द्यायला सुरुवात करतो. अबूला, हनीफाला, अब्दुल खादरला — सर्वांना दमदाटी करतो. हनीफा, सुलेमान, अब्दुल खादर या साऱ्यांच्या पोरांना धरून चोपतो. नाही मारीत ते फक्त एक पात्तुम्माच्या पोरीला—खदीजाला, कारण ती बेटी बाहेर कुठं कधी दिसतच नाही. माझ्या ह्या रागाच्या तडाख्यातनं, दमदाटीतनं घरातल्या बायकाही सुटत नाहीत — विशेषत: माझ्या धाकट्या भावांच्या बायका. माझा आवाज एकदा चढू लागला की घरात सर्वत्र चिडीचूप होतं. घर असं नीरव झालं की मी अभिमानानं फुलून येतो.

पात्तुम्माची शेळी फणसाची वाळकीचिळकी पानं खात अंगणात उभी आहे. खाऊ

दे. भरपूर, अगदी पोटभरून खाऊं दे. व्याल्यावर भरपूर दूध येईल. सुबैदा, रशीद, खदीजा. अबी, सैद् मुहम्मद, पात्तुक्कुट्टी —— सारी जणं थोडं थोडं दूध पितील तर बरं होईल. माझ्या घरात कुणीही दूधतूप खात नाही. मी तूप खातो. दूध पितो, इथं माझं काम काही स्पेशल आहे. माझी गोष्ट वेगळी आहे. हां ह्या दुधातुपाच्या गोष्टी वरनं वीसपंचवीस वर्षांपूर्वीच्या काही प्रसंगांची सहज आठवण येते.

त्या वेळी मी, अब्दुल खादर, हनीफा अन पात्तुम्मा लहान होतो. मला वाटतं आनुम्मा त्या वेळी जन्मलेली नव्हती. अबूतर नव्हताच नव्हता.

घरात गाय होती. दूधदही मुबलक असायचं. बाप्पा — माझे वडील त्या वेळी लाकडाच्या व्यापाराच्या जोडीनं नावा तयार करण्याचाही धंदा करायचे. डोंगरावरच्या जंगलातली झाडं तोडून तिथंच नावा बनवायचे. त्या नीट एकत्र बांधून नदीच्या पात्रातनं घाटावर न्यायचे अन चांगल्या घाऊक भावात विकायचे.

त्या काळी घरात तुपाला तोटा नसायचा. पिवळ्या रंगाचं, रवेदार, सुगंधी असं हे शुद्ध गायीचं तूप काचेच्या बरण्यांतनं शिगोशीग साठवून ठेवलेलं असायचं. कुटचत्तूर डोंगरावरचा औषधांसारखा गुणकारी झाडपाला खाऊन जोगावलेल्या गायींच्या दुधाचं असायचं हे तूप. तुपाच्या बरणीच्या शेजारीच असायची साखरेची बरणी. कोपऱ्यातल्या फळीवर ठेवलेल्या असायच्या ह्या दोन्ही बरण्या. सकाळी न्याहारीच्या वेळी अन दुपारी भात जेवताना आम्ही सारीजणं भरपूर तूप खात असू.

बाप्पांच्या हातचा मार मी खूप खात असे. अब्दुल खादरला कधी मार नाही मिळायचा. ते भाग्य केवळ माझ्याच वाट्याला सहजपणं येई. कधीकधी सकारण —— कधी काही कारण नसतानाही वडील मारीत ते मारीतच, आईही मारायची. उम्मानं मला मारलं आहे. पळीच्या दांड्यानं मारीत मारीत ती मला स्वयंपाक घरातून बाहेर हाकलून लावायची. सदा-काहीतरी खावं अशी माझी इच्छा व्हायची म्हणून स्वयंपाक घरात शिरून भांड्यात हात घालून जे मिळेल ते मी मटकावीत असे. अब्दुल खादरही हेच करायचा, पण त्यावर कोणी विश्वास ठेवायला तयार नसे. चोरी त्यानं केली तरी मार मात्र मलाच खावा लागे.

एक दिवस न्याहारी अन दुपारचं जेवण या मधल्या काळात असाच एक शुभ मुहूर्त गवसला. पोटात जराजरा भूक जाणवू लागली होती. हाताला लागेल ते तोंडात टाकून गट्टं करायलाही नामी संधी होती. मी स्वयंपाक घरात गेलो. तिथं उम्मा उभी होती. मोलकरीणही होती. तिचं नाव—'नङ्ङेली'. तीही मला धरून चोपायची. मारून पिटून हाकलून काढायची.

मी छोटा मालक होतो. मोलकरणीनं आपल्या धाकल्या मालकाला असं वदडावं हे काही योग्य नव्हतं. पण ह्या न्यायअन्यायाचं आमच्या घरी सोयरसुतक नव्हतं. उम्माकडं ह्या बाबतीत तक्रार-बिक्रार केली तर, "छान झालं, भांड्यात हात घालून तू वस्तू काढून खाल्लीसच का ? " हेच उत्तर मिळायचं. इतकंच नव्हे, तर उम्मा म्हणायची, " ह्या नङ्ङेली अम्मानं पाजलंय तुला लहानपणी... जिचं दूध प्यालास तिच्या थपडा खाल्ल्यास म्हणून बिघडलं कुठं ? हक्कच आहे तिचा तो. असो, मग मी नाहीच काही हाती लागलं तर निदान एखादी कैरी तरी दातानं टोकरून खावी, पण तीही हाती लागण्याचा काही मार्ग दिसत नव्हता. नङ्ङेली म्हणाली, -- " उपाशीच राहा थोडा वेळ. आत्ता जेवायला वाढते -- का, मार खायचाय ?"

"हें ए ए ! " गुपचूप तिथून चालता झालो. फिरत फिरत खोलीत येऊन ठेपलो. वा: तिथं जणू एक भांडारच सापडलं. तूप आणि साखरेच्या बरण्या अगदी एक-मेकींना खेटून ठेवल्या होत्या कोपऱ्यातल्या फळीवर. विचार केला यातलं थोडं थोडं एकत्र मिसळलं तर काहीतरी झकास खाद्यपदार्थ तयार होईल. डोक्यात एकदा विचार शिरल्यावर मग कृतीला फारसा वेळ नाही लागला. सगळ्यांचा डोळा चुकवून मी चिनी मातीचा एक वाडगा घेतला अन बाप्पांच्या झोपायच्या खोलीत गेलो. तुपाची बरणी अलगद उचलली अन हलकेच बाप्पांच्या पलंगावर ठेवली. झाकण काढलं अन स्वत:च्या पवित्र हातांनी अर्धी वाटी तूप ओतून घेतलं. नंतर बरणी जागच्या जागी व्यवस्थित ठेवून दिली. साखरही तशीच व्यवस्थित काढून घेऊन वाडगा गच्च भरला. दोन्हीही बरण्या कोपऱ्यातल्या फळीवर जशाच्या तशा व्यवस्थित ठेवून दिल्या. कोणालाही पत्ता लागला नसता काय केलंय त्याचा. बाप्पा जसे तूप-साखर काढून घेतल्यानंतर चमच्यानं ढवळून एकत्र मिसळायचे, तसे मीही हातानं ते मिसळले. मग त्याच पलंगावर मांडी ठोकून बसलो. तूपसाखरेचं ते मिश्रण कुरकुर आवाज करीत थोडं थोडं खाऊ लागलो. साखर दाणेदार होती. तुपात नीट मिसळली गेली नव्हती. विरून विरघळून एकजीव झाली नव्हती. मी चवीनं ते सारं खात होतो. त्याच वेळी, गंभीर--अगदी घनगंभीर स्वरात एक प्रश्न कानांवर आदळला ! मी क्षणमात्र चमकलोच ! प्रश्नकर्ता होता अब्दुल खादर. तो जवळच उभा होता. तो ह्या खोलीत कधी अन कसा आला याचा मला बिलकुल पत्ता लागला नाही. त्यानं हलकेच विचारलं, " भाईजान, काय खाताय आपण ? "

मीही त्याच थाटात उत्तर दिलं. म्हणालो, " औषध घेतोय एक. "

"मी आपल्यामागंच होतो. सारं काही पाहिलंय मी. मलाही द्या नाहीतर साऱ्यांना सांगेन मी."

एखादं मोठं रहस्य प्रकट करावं अशा स्वरात मी म्हणालो, "माझा धाकटा भाऊ ना तू ?"

"म्हणून तर म्हणतो -- मलाही द्या ते !" मी वाडगा त्याच्या हवाली केला. त्यानं तो सारा चाटूनपुसून फस्त केला.

"आता ह्यापुढं मी नाही असं काही करणार," मी म्हणालो, "अन तूही नाही करायचंस. घ्यायचं नाही असं काही चोरून-मारून. समजलं !"

हा करार आपापसांत नक्की करून आम्ही खोलीतनं बाहेर पडलो. वाडगा जिथून घेतला होता तिथं नेऊन ठेवन दिला अन तिथून आम्ही दोघे असे काही सटकलो की, जणू काही जगात काही घडलंच नाही.

ह्या प्रसंगानंतर मी तूप वा साखरेला कधी स्पर्श केला नाही. हे संपूर्ण सत्य आहे. तुपाचे गुणावगुण वगैरे मला माहीत नव्हते. खायला काही सापडलं नाही, म्हणून जे खाण्यासारखं समोर दिसलं ते खाऊन टाकलं इतकंच. घरात खाण्याजोग्या बऱ्याच गोष्टी होत्या. पिकलेला फणस, पिकलेले आंबे, तळलेलं मटन अगदी बरणी-भर -- ह्या सर्वांवर डोळा ठेवून मी धकवून नेत होतो. दिवसामागून दिवस जात होते. आता उगाच मला मार खावा लागत होता अन अब्दुल खादर तर बराच आजारी होता !

मला चोप मिळायचं कारण ? म्हणे कोणीतरी चोरूनमारून तूप खातंय. पलंगावर अन बरणीवरही तुपाचे डाग पडल्याचं आढळलंय. मला मार मिळतच होता. अब्दुल खादरचं आजारीपण मात्र मोठं मजेशीर होतं. तो एखाद्या फुग्या-सारखा दिवसेंदिवस फुगतच चालला होता. केवळ पाणी पिऊनच जीव जगवीत होता. पाण्याखेरीज त्याच्या पोटात काही जात नव्हतं. दुसरं तिसरं तो काही खाऊ शकत नव्हता !

"पोराला काहीतरी फार मोठा आजार आहे" -- नङङेली म्हणाली. उम्मानं-ही तिच्या होला हो म्हटलं. बाप्पा 'कणियान'[1] ला बोलवायला गेले. त्या काळात कणियान हाच सर्वांत थोर चिकित्सक मानला जात असे. उम्मा अब्दुल खादरला

१. केरळमध्ये ज्योतिष्याला 'कणियान्' म्हटले जाते...गणित करणारा तो 'गणकन्' अशा अर्थाने 'कणियान्' हा 'गणकन्'चा अपभ्रंश. तो फार मोठा चिकित्सक असल्याचे मानले जाते.

आपल्या पुढ्यात मांडीवर बसवून म्हणायची, "हाय ! अल्लाह ! माझ्या पोराला काय झालंय हे ? "

नङ्ङेली म्हणायची, " हाय ! दैवा ! माझ्या सोन्यासारख्या पोराला दीर्घायुरारोग्य लाभो. त्याला इडा-पीडा न होवो ! "

निर्घोर मनानं, आजारी होऊन, टम्म् फुगून, अब्दुल खादर साऱ्या जणांचा जणू जीव की प्राण असा लाडका होऊन बसला होता.

मी त्याच्याकडं रोखून पाहिलं अन लगेच अशी काही मुद्रा केली की त्यातून व्यक्त व्हावं, " व्वा रे चोर ! ते सारं तूप मारे चोरून खातोयस अन कसा झकास फुगतोयस ! "

पण माझ्या ह्या भावव्यक्तीनं त्याच्या चाल-चलणुकीत काही फरक पडला नाही की त्याच्यावर कसला काही परिणाम झाला नाही. कणियान आला. दुसरा एक चिकित्सामार्तंड 'वेलन '[१] ही आला. त्यानंतर एका मुसलमान फकीराला—'मुस्लियार '[२] लाही बोलावणं धाडलं गेलं.

दिवसामागून दिवस जात होते. बरणीतलं तूप कमी कमी होत होतं. मी रोजच्या रोज व्यवस्थित मार खात होतो. अब्दुल खादर फुगत चालला होता. आजारी तर होताच म्हणा तो ! तो औषध वगैरे घ्यायचा नाही . . . घेतल्याचं सोंग करून गुपचूप फेकून द्यायचा. कधीमधी थोडासा भातबीत खायचा. आजारी असल्यामुळं सारे जण त्याचे नुसते लाड लाड करीत; पण त्याच्यात कसली अशक्तता बिशक्तता काही एक नव्हती !

तो रोज तूपसाखर खात असतो हे मला माहीत होतं. पण सांगणार कुणाला ? कोणी विश्वास ठेवायला —— ऐकायलाच तयार नव्हतं तर ! एक दिवस मी त्याला तळलेली सागुती दिली. ती मी कपाटातून चोरून आणली होती. त्यानं ती खाल्ली. तसं मी त्याला म्हटलं, " बय ! तू माझा धाकटा भाऊ आहेस ना ? खरं सांग, तू असा दिवसेंदिवस फुगत कसा चाललास ? तूप-साखर खाल्यामुळंच ना ? " जा, जा, भाईजान, निमूट जा इथून. मला बरं नाही. मी आजारी आहे."

---

१. 'वेलन '—आपल्याकडच्या देवऋषी, पंचाक्षरी वा भगताप्रमाणे छाछू करणारा मांत्रिक. भूतपिशाच्चांच्या बाधेवर मंत्र-तंत्र, गंडेदोरे वगैरे करणारा. हा हलक्या जातीतला असतो. ह्या विषयातील ह्याचा अधिकार गावकरी मानतात.

२. मुस्लियार—मंत्रतंत्र आणि छाछू करून रोगनिवारण करणारा मुस्लिम फकीर. हा मुल्ला. मौलवीप्रमाणे धार्मिक कार्येही करतो.

याची ही चोरी कशी काय पकडावी ? याचा हा चोरटेपणा कसा काय उघड-कीला आणावा ? नुसतं सांगून कोणी विश्वास ठेवणार नाही. तरीसुद्धा मी उम्माला सांगितलं. नङ्डेलीलाही सांगितलं. म्हटलं——तूप-साखर खाऊन फस्त करणारा चोर तोच आहे !

मला वाटलं होतं, तसंच झालं. कोणीही माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवला नाही. पण माझ्या आंतरिक सच्चाईमुळं एक घटना घडली. शुक्रवारचा दिवस होता. बाप्पा नमाज पढण्यासाठी मशिदीत गेले होते. उम्मा शेजारच्याच घरात काही आयाबाया गोळा करून गप्पा-टप्पा करीत होती. तिनं अब्दुल खादरच्या फोपशा रोगाचाही विषय काढला. हे सारं ऐकून झाल्यावर मी घरी आलो. नङ्डेली झोपली होती. स्वयंपाकघरात घुसून थोडी शोधाशोध केली. जे हाताला लागलं ते मटकावलं. तिथून पडवीकडं जात होतो तो वाटेत बाप्पांच्या खोलीतनं कसलासा आवाज कानी पडला —— भिंतीवर सावली हलल्यासारखी वाटली. मी हलकेच चोरून पाहिलं. पलंगाच्या खालून दोन पाय जरासे बाहेर आल्यासारखे दिसत होते. त्यातला एक पाय हडकुळा रोडावलेला होता.

अब्दुल खादर तूप-साखर चोरून खातोय !

मी हलकेच तिथून सटकलो अन उम्माजवळ जाऊन म्हटलं, " अब्दुल खादरचा आजार बघायचाय तुला ? तर मग धावत चल पाहू. "

सर्वांना बोलावून दरवाजापाशी उभं केलं अन मग दारं उघडली. अब्दुल खादर आपला चिनीमातीच्या वाडग्यातनं तूप-साखर खात पलंगाखाली बसलेला. चोराला मुद्देमालासकट पकडून सर्वांसमोर उभं केलं. उम्मानं त्याला खूप खूप पिटलं. गडबड ऐकून नङ्डेली जागी झाली. तिनंही पिटनं. मी ते सुंदर दृश्य पहात स्वस्थ उभा राहिलो. घरी आल्यावर बाप्पांनीही त्याची हड्डी व्यवस्थित नरम केली.

हे सारं झाल्यावर माझी त्यानं एकट्यानं भेट घेतली तेव्हा तो म्हणाला, " मी तुमचा धाकटा भाऊ नाही का ? का पकडून दिलंत आपण मला ?"

" चोर कुठला ! बिलंदर चोर ! तुझ्या पायी मी किती मार खाल्लाय? त्या वेळी सुचला होता का हा विचार कधी तुला——मी तुझा थोरला भाऊ आहे ते?... चोर ! "

हे सारे आठवून मला हसू आलं. त्याच वेळी उम्मा तिथं येऊन ठेपली. बडी बी —— थोरली बहीण —— ही विचारायला लागली, " कायरे, एकटाच बसल्या बसल्या हसतोयस ते ?"

मी म्हणालो, "एक जुनी गोष्ट आठवली अन् हसू आलं. लहानपणी अब्दुल खादर तूप-साखर खायचा नाही ?"

"अजून विसरला नाहीस तू ते सारं ?"

"अंहं."

"तुझ्याजवळ पैसे असतील तर मला एक पाच रुपये हवेत. पात्तुम्माच्या शेळीनं भात शिजवायची हंडी (मडकं) फोडलीय."

"भाईजान, ती आनुम्माची शेळी असणार ..." पात्तुम्मानं म्हटलं.

आनुम्मा धावतच आली, म्हणाली, "माझ्या शेळीनं नाही -- इत्तात्ताच्या शेळीनंच फोडलीय."

पात्तुम्मा म्हणाली, "पुरे हं ! पुरे आता ! भाईजान बसलेत, थोडी नम्रता-- काही शिस्त -- आदब जरा पाळायला शिका. तू कसं ओळखलंस की ती शेळी माझीच आहे म्हणून, जरा सांग तर खरं !"

आनुम्मानं म्हटलं, "भाईजानना समजावं म्हणून तर सांगते आहे हे मी सारं. आपली शेळी इथं आली रे आली की मी सरळ माझी शेळी आत नेऊन बांधते. आपली शेळी माझ्या शेळीपुढचं गवत चोरून खाते, आमचा कसाव्याचा पुट्टू चोरून खाते, आमचा बिन दुधा-साखरेचा चहा चोरून पिऊन टाकते. पोराबाळांच्या मुखालाही काही लागू देत नाही. सारं सारं आपली शेळी खाऊन फस्त करत्ये सदान कदा..."

पात्तुम्मानं तिला मध्येच उपरोधानं टोकलं, "पुरे ग पुरे ! तुझीच काय ती एकुलती एक शेळी -- चोरीबिरी न करणारी ! कुठून आली ग ही तुझी शेळी ?"

आनुम्मा आपल्यावरचं ऋण मान्य करीत उद्गारली, "ती तर इत्तात्तानं दिली होती."

"पहा हं ! ह्या जगात कितीशा थोरल्या वहिणी आपल्या धाकट्या वहिणींना अशा शेळ्या देत असतील, सांगा तर खरं ?"

"ओह ! किती तरी थोरल्या वहिणी आपल्या धाकट्या वहिणींना हत्ती देतात हत्ती. गांडुळासारख्या एका शेळीची गोष्ट काय करताय आपण ?"

पात्तुम्माच्या अंगात जणू भूत संचारलं. ती एकदम कडाडली, "नशीब समज तुझं, भाईजान इथं बसलेले आहेत, नाही तर तुला चांगला धडा शिकवला असता. ऐक ग ! जे अल्लातालाच्या दरबारात मंजूर होणार नाही असं काही मेहरबानी करून भकू नकोस. माझ्या जवळ दोन शेळ्या होत्या -- त्यातली एक धाकटी बहीण म्हणून प्रेमानं मी तुला दिली -- निदान एवढी तरी आठवण ठेव आपल्या मनाशी.

नंतर पात्तुम्मा माझ्या जवळ आली अन तिनं हलकेच विचारलं, — " खदी-जाच्या कानातल्याची गोष्ट विसरलात की काय आपण ?"

मी त्याच थाटात उत्तरलो, " ऊंहू. "

पात्तुम्मानं जाता जाता बजावलं, " कोणाला कळता कामा नये हं — "

लगेच आनुम्मानं माझ्याजवळ येऊन विचारलं, " इत्तात्ता गुपचूप काय सांगत होती, भाईजान ? "

पात्तुम्मानं ते पाहिलं तशी ती धावतच आली. ठसक्यात म्हणाली, " काहीही सांगत नव्हते हो ! "

" नाही, " आनुम्मा म्हणाली, — " समजले मी सारं काही. आम्हांला न समजता स्वतःला गुपचूप काही तरी द्यायला सांगत इत्तात्ता होती खरं ना ? सांगा, भाईजान, काय मागितलंय इत्तात्तानं ?

नेमक्या ह्याच क्षणाला मागच्या बाजूनं दोन विजल्या कडाडल्या. अब्दुल खादरची वायको कुञ्जानुम्मा अन हनीफाची सौभाग्यवती ऐशोम्मा यांचे आवाज होते ते — " काही दागदागिने वगैरेचं असेल तर आमच्या मुलाबाळांनाही हवेत हो..."

मला कल्पना नाही, ही गोष्ट त्यांच्या मनात कशी आली. हा साक्षात्कार त्यांना कसा काय झाला ? कदाचित बायकांचं हे असंच असेल; पण हे ऐकताच पात्तुम्माला पुन्हा राग आला — ती म्हणाली, " खदीजा, चल हाक मार आपल्या शेळीला. निघू या आपण इथून — इथं सारे सैतान रहातात, सैतान. आता ह्यापुढं आपण ह्या घरात पाऊल ठेवता कामा नये. "

आनुम्मा मनोमन उमगली — म्हणाली, " अरे देवा ! तेच आहे तर...सोन्याचे दागिनेच नक्की — काय आहे, भाईजान ? सांगा ना जरा..."

मी म्हटलं — अर्थात जाहीर घोषणाच केली, — " सगळे नीट ऐका — खदीजाला मी दोन कर्णफुलं करून देईन असं म्हटलंय — देइनही करून. काय कोणाची काही हरकत आहे ? "

आनुम्मा म्हणाली, " भाईजान, मलाही हवीयत दोन फुलं. "

" पुरे झाला तुझा हावरटपणा ! आपण आपल्या नव्या घरात रहायला गेलो की सारी भांडीकुंडी विकत घेऊन द्या म्हणून भाईजानना म्हटलं होतंस की नाही तू ? अन त्यांनी ते कबूल केलंय की नाही ? मी सारं जाणून आहे म्हटलं छोट्या बहिणाबाई — समजलं ? "

ही गुप्त गोष्ट पात्तुम्माला कशी काय समजली ?

# ४

आरडा–ओरडा, गडबड ऐकून मी स्वयंपाकघराकडे गेलो अन पाहतो तो उम्माच्या अध्यक्षतेखाली सर्व स्त्रिया आपल्या हैराण –– हवालदिल अवस्थेत उभ्या आहेत. मध्ये आहे पात्तुम्माची शेळी –– तिच्या डोक्याचा पत्ता नाही, म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की काही तरी खायला मिळेल ह्या लोभानं तिनं एका मडक्यात तोंड घातलं अन ते डोक्यासकट आत अडकून बसलंय. तिला बाहेर काढता येत नाही. म्हणून ती मडक्यासहित उभी आहे...उभी आहे, याचा अर्थ बायकांनी तिला धरून पकडून ठेवलं आहे. मडकं अलगद कसं सोडवता येईल ही खरी समस्या.

पात्तुम्माच्या शेळीनं जी आगळीक केली ती माझ्या दृष्टीला पडली, त्यामुळं पात्तुम्माला जरा आपली बेअब्रू झाल्यासारखं ––पाणउतारा झाल्यासारखं वाटलं. त्यावर सारवण घालीत ती म्हणाली, "ही असं काही करणाऱ्यातली नाही बरं का, भाईजान ! "

मी एक छोटासा दगड घेतला अन मडकं फोडून शेळीला संकटमुक्त केलं.

" वाहव्वा ! असं तर आम्हांलाही करता आलं असतं ! " उम्मा उद्गारली.

" वा: काय डोकं आहे ! चांगलं मडकं आपलं फोडून टाकलं..." कोणीसं आपला अभिप्राय जाहीर करून टाकला.

अपमानित अवस्थेत मी आपला पुन्हा पडवीत येऊन बसलो. तिथं अब्दुल खादरची थोरली मुलगी पात्तुक्कुट्टी धावत धावत आली. तिच्या तोंडातले काही दात गायब झाले होते. ती म्हणाली, " अबीनं आम्हांला मारलंय् " तोपर्यंत अबीही तिथं येऊन पोहचला होता. त्यानं पात्तुक्कुट्टीच्या विरुद्ध तक्रार नोंदवीत म्हटलं, " बड़ी बीनं (आक्कानं) आम्हांलाही मारलं ..." आता ह्यापुढं भांडण — मारामाऱ्या बंद अशी दोघांनाही समज देऊन वाटेला लावलं. तेवढ्यात एक फिर्याद घेऊन सैदू मुहम्मद तिथं दाखल झाला. म्हणाला, " मामूजान ! लैला मला ' उल्लाटत्तिपारू ' म्हणून चिडवत्येय बघा..."

म्हणजे आता कमाल झाली म्हणायची. एक पोरगी एका पोराला चक्क आपली ' उल्लाटत्तिपारू ' म्हणून फिरून संबोधतेय.

" लैला ! " मी हाक मारली. लैला आली. डोळे पाण्यानं डबडबले होते. आल्या आल्याच म्हणाली, " चाचाजानना आम्ही नाही नेणार ––"

" नको नेऊस. आण रे, एक छडी आण. "

सैदू मुहम्मदनं चिंचेचा एक लवलवता मजबूत फोक तोडून आणला. लैलाला त्या फोकानं धाक दाखवीत ताकीद दिली की, पुन्हा कोणाला त्या नावानं तिनं हाक मारायची नाही. हे प्रकरण असं निकालात काढलं.

कित्येक कोंबड्या जोरजोरानं चीत्कारत क्वॅक् क्वॅक् करीत, फडफडाट करीत धावत उडत माझ्या अंगावर येऊन कोसळल्या. त्यांच्या पाठोपाठ पात्तुम्माची शेळीही धावत दौडत येत होती. काही विशेष घडलेलं नव्हतं. पात्तुम्माच्या शेळीनं आणखी एक भात शिजवायची मातीची हंडी फोडली होती. आनम्मा आणि ऐशोम्मा... दोघींच्या बडबडण्याचा आवाज. उम्माचं दम देणं, पोरांचं खिदळणं, पात्तुम्माची फिर्याद. अन ... पात्तुम्माची शेळी फणसाच्या झाडाखाली उभी होती, जणू तिला कशाचा काही पत्ताच नव्हता.

संध्याकाळी जवळजवळ चार वाजता मी जरा फिरून यावं म्हणून बाहेर पडलो. बाजारात पोहोचलो. तिथं एक आश्चर्याची गोष्ट दिसली.

बाजारच्या त्या भाऊगर्दीत पुढ्यात एक छोटीशी टोपलीभर जांभळं मांडून दाटी-वाटीत बसले आहेत अबी अन पात्तुक्कुट्टी ! हजारो हत्तींच्या जमावात दोन पिटुकले उंदीर दिसावेत तसं होतं ते दृश्य. दोघेही जांभळं विकत होते. अर्थात अबी हा त्यातला पुढारी.

" एक हाताचे तीन पैसे. दोन हात अधिक एकाला दोन तीन पैसे. "

याचा अर्थ -- तीन पैशांना पाच अन सहा पैशांना अकरा जांभळं. अबीच्या हातांना पाच पाच बोटं होती ना ? मी त्यांची ह्या पद्धतीनं चाललेली जांभळाची विक्री पहात उभा होतो. त्यांनी सहा आण्यांची जांभळं विकली. ते सहा आणे मी माझ्या ताब्यात घेतले.

त्या रात्री मी उम्माला आठ आणे दिले. उम्मा खूष झाली. रात्री जेवताना तिथं बसलेल्या बापलेकांना मुलांच्या पालनपोषणाच्या पद्धती अन त्यांच्या आयांना पोटभर खाऊपिऊ घालायची आवश्यकता ह्याविषयी चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. मुलांना स्वच्छ, नीटनेटकं राहायला शिकवणं -- चांगलं वळण लावणं किती आवश्यक आहे त्याविषयी एक भाषण ठोकलं. घर अन आसपासची जागा स्वच्छ राखण्याची आवश्यकता ह्यांविषयीही समजावून सांगितलं.

ह्या सर्व गोष्टींविषयी उत्तरादाखल हनीफानं म्हटलं, " मी आपला फौजेतच चालता होतो कसा. "

अबूनं म्हटलं, " भाईजान, बस, फक्त एक काम करा ! थोडा पैसा खर्च करा. आपल्या घराचं सध्याचं छप्पर बदलून ते कौलारू करायला हवं. आपल्या येण्यानं अंगण तर साफ झालंच आहे. "

अंगणाच्या साफसफाईवर मी पैसे खर्च केले होते. दगडगोटे आणवून मी अंगण अगदी पक्कं करवून घेतलं होतं.

" हे सारं राहू द्या सध्या, " अब्दुल खादरनं म्हटलं, " सारं काही व्यवस्थित होईल. पात्तुम्माची शेळी जरा एकदा विऊ द्या. "

असेच आणखी काही दिवस गेले.

हुम् ! पात्तुम्माची बकरी व्याली एकदाची.

दुपारचा शुभ मुहूर्त ! पाणी थोडं थोडं झिरपत होतं. बातमी ऐकली अन माझं काळीज धडधडायला लागलं. काय सांगाव कसलं संकट वेळेला उभं राहतं. बाळंत-पणात प्राण गमावल्याची कित्येक उदाहरणं माझ्या मनात तरळून गेली. मन फार व्याकुळ झालं. उम्माला शंभरदा हाक मारली. बोलावलं.

" उम्मा ! तिच्या जवळच उभी रहा ! " मी कळवळून उम्माला विनंती केली. माझी तगमग -- कासाविशी एकसारखी वाढतच होती -- मनात येई, काय होईल ? एकदा जाऊन स्वतःच पाहून यावं काय ? पण जाऊन पहायची हिम्मत होत नव्हती. पाऊल उचलत नव्हतं ... तरीसुद्धा जरा ओझरतं पाहून घेतलंच. फक्त शेळी तेवढी दिसत नव्हती, बाकी सगळे लोक तिथं हजर होते भाऊगर्दी करून. उम्मा, आनुम्मा, ऐशोम्मा, पात्तुक्कुट्टी, अबी, अरीका, सैदू मुहम्मद, रषीद, सुबैदा--हे सारे तर होतेच पण त्यांच्या व्यतिरिक्त शेजारपाजारच्या साऱ्या आयाबायाही त्या गर्दीत दाटीवाटीनं उभ्या होत्या. जणू काही तिथं कसला तरी उत्सव साजरा होत होता. सारेजण मोठ्या खुषीत होते.

कोणालाच कसली काही काळजी--चिंता कशी काय वाटत नाही ? मी उम्माला हाक मारली अन् विचारलं, " पात्तुमाला कळवलंत का हे सारं ? "

त्या वेळी तिथं उपस्थित रहाण्याचा खरा हक्क पात्तुम्माचाच होता. पण तिला बोलावून आणण्यासाठी कोणालाच पाठवलं गेलं नव्हतं. उम्मा अन इतर बायकांना कसली काही परवाच नाही. हे सारं पाहिलं अन माझ्या लक्षात आलं की -- यांच्या दृष्टीनं ही काही फार महत्त्वाची बाब नाही. ह्या साऱ्या आजवर कितीतरी वेळा बाळंतपणाच्या ह्या अनुभवातनं गेल्या आहेत. उम्माची स्वतःची कितीतरी मुलं आहेत. तिच्या मुली -- पात्तुम्मा अन आनुम्माही कित्येक मुलांच्या

आया झाल्यात. उम्माच्या सुनांनीही हा सारा अनुभव घेतलाय अन म्हणूनच बाळंतपण वगैरे गोष्टींचं यांना खास काही अपरूप वा आगळेपण असण्याचं कारण नाही. कुठंही बाळंतपणाविषयी यांच्या कानी काही पडलं की यांचा प्रश्न आपला एकच—" मुलगा की मुलगी ?" बस !

परंतु मला तर असला कसला काही अनुभव नव्हता ! म्हणून मी जरा घाबरून गेलो होतो.

मावळतीकडच्या पडवीत मी एकटाच बसलो होतो. काय होतंय ते कळायला काही मार्ग नव्हता. काय चाललं असेल आता तिथं ? बिडचांमागून बिडचा फुंकीत होतो मी. अस्वस्थ मनानं इकडून तिकडं अन् तिकडून इकडं अशा एकसारख्या नुसत्या येरझारा घालीत होतो. अशा अवस्थेत असतानाच अबी अन पात्तुक्कुट्टी माझ्याकडं आले. अबी फुशारकी मारीत होता — " मी पाहिलं पहिल्या छूट."

हे ऐकताच लैला किंचाळली, — " भाईजानला नेणार नाही आम्ही. मीच पाहिलं पहिल्या छूट... अगदी सर्वांच्या म्हणजे सर्वांच्या आधी. "

ह्या गाढवाच्या लेकानं काय पाहिलं सर्वांच्या आधी ?

मी अबीला विचारलं, " काय रे, काय पाहिलंस तू साऱ्यांच्या आधी ?"

अबीनं मोठ्या आश्चर्यानं सांगितलं, " शेळी कशी व्याली ते सारं सारं पाहिलं. सर्वांच्या आधी मीच पाहिलं. "

" अरे व्वा ! शेळी व्याली तर ?" मी विचारलं.

पात्तुक्कुटीनं लागलीच उत्तर दिलं — म्हणाली, " हां, हां ! व्याली ती कशी कशी व्याली ते पुरेपूर मीच पाहिलं सर्वांच्या आधी. "

" उफ ! " तर मग शेळी व्याली तर. कसली काही अडचण आली नाही. फार शांत वाटलं मनाला ते ऐकून. उठलो अन जाऊन पाहिलं. खालच्या पडवीत मायलेकरं पडली आहेत. ते सुंदर पांढरं शुभ्र कोकरू ... ह्या साऱ्या भयानक जगाकडं आणि त्यातल्या एकूण कर्मकटकटींकडं एक प्रकारच्या बेफिकिरीनं पहात पडलंय.

त्याला गरम पाण्यानं आंघोळ घाला, दूध पाजा वगैरे सांगावंसं वाटलं. पण दूध कुठून मिळणार ? गरम पाण्याची व्यवस्था करता येईल. पण मी, असलं काही सांगायला गेलो तर माझी टर उडवायला ह्या बायकांना नेमकी संधी सापडेल. तरीही मी उम्माला विचारलंच. म्हटलं, " त्याला काही खायला बियला घातलंन की नाही ?"

" नाही. अजून नाही काही घातलं. थोड्या वेळान काही खास पाला घालणार

आहोत. ही अशीच पद्धत असते."

"त्या कोकराला जरा चटईबिछाईवर नीट झोपवा, मी म्हणालो, — "तसंच गार ठणक जमिनीवर लोळत पडलंय बिचारं..."

कल्पना नाही त्यांनी काय केलं ते — पण मी मात्र एक मोठं केळं आणून शेळीच्या पुढ्यात टाकलं. मला वाटतं, तिनंही ते कृतज्ञता व्यक्त करीत खाऊन टाकलं.

साऱ्या बायका माझ्याकडं पहात अशा काही थाटात उभ्या होत्या, की जणू त्यांना विचारायचं होतं, "काय हो, हा काय प्रकार आहे ?"

फक्त उम्मा तेवढी बसल्या बसल्या माझ्याकडं पहात गालातल्या गालात हसत होती. रात्री पात्तुम्मा, खदीजा अन कोच्चुण्णी आले. शेळी व्याल्याचे वृत्त ऐकूनही त्यांनी तोंडातून चकार शब्द काढला नाही.

झोपायच्या वेळी मी विचारलं, "शेळीच्या कोकराला कुठं ठेवलंय ?" कोणी-तरी उत्तर दिलं, "स्वयंपाकघरात."

"चुलीत विस्तव वगैरे तसाच राहिला तर नसेल ना ?" उम्मानं उत्तर दिलं, "चांगलं टोपलीखाली झाकून ठेवलंय त्याला."

टोपलीखाली झाकून ठेवलंय !

"आनुम्मा !" मी जोरानं ओरडलो, — अगं, त्याचा जीव नाही का गुदमरून जाणार अशानं ? तुम्ही कोणी आपल्या तान्ह्या पोरांना कधी असं टोपलीखाली झाकून ठेवू शकाल का ?"

"तर मग आता त्याचं आणखी काय करायचंय ?" बस, हेच काय ते उत्तर मिळालं. उत्तर कोणी दिलं काही कल्पना नाही. मी आपला गुपचूप अंथरुणावर जाऊन पडलो. ह्या लेकुरवाळ्या बायांना मी असलं काही सांगणं विचारणं निरर्थक आहे. काही विचारलं, बोललो, तर माझी पाठ वळताच त्या माझी नक्कल करून भरपूर हशा मात्र पिकवतील. माझं लग्न झालेलं नाही, मी अविवाहित आहे, तेव्हा ज्या गोष्टींचा मला कसला काही अनुभव नाही. त्याविषयी मी काही बोलता कामा नये. असा विचार करीत, अंगावर चादर ओढून घेत डोळे मिटून मी झोपी गेलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी स्नान वगैरे आटोपून, सकाळची कामं मार्गाला लावून मी बसलो होतो. आनुम्माला विचारलं, "त्यांना काही घातलंन ?"

"त्यांना असं म्हटल्यामुळं आनुम्माला वाटलं की पात्तुम्माच्या शेळीविषयीच आपल्याला विचारण्यात येत आहे. गवत वगैरे घातलंय म्हणून तिनं सांगितलं — "आनुम्माच्या शेळीचंच गवत."

पात्तुम्माची शेळी अन तिचं कोकरू अंगणातल्या फणसाच्या सावलीत उभी आहेत. कदाचित आई आपल्या कोकराला आपलं खाणं कोठून मिळतं ते दाखवीत असावी. कोकरू धडपडत धडपडत चालतंय. त्याला उचलून कवेत घ्यावं. त्याचे जरा लाड करावेत असं सारखं आतून वाटतंय. ह्याच क्षणी पुढ्यात येऊन उभा ठाकला हनीफा. त्यानं नुसतीच लुंगी गुंडाळली होती. तो म्हणाला, "भाईजान ! एक दहा रुपये हवे होते. छोट्या भाईजानकडं मागितले तर दम देतील. अब्दुखील माझं हसू करील. पहा ना, माझ्याजवळ आज पैसे असते तर एखादं खमीस शिवून नसतं का घातलं?"

"तू माझं लांब रुंद धोतर अन खमीस मध्ये एक दिवस घेतलं होतंस ना ?"

"मी ?...नको. काही एक नकोय मला. मी आपला फौजेतच जातो कसा. इथं कुणालाच मी नकोय. कुणालाच माझी गरज नाही. सरकारला माझी गरज आहे. लक्षात ठेवा — आपण जे धोतर अन खमीस दिलं होतं ना ..."

"जरा थांबा मिस्टर. मी दिलं नव्हतं. परटाकडून धुवून आल्या आल्याच तुम्ही मला न सांगता सवरता ते लंपास केलं होतं. माझ्यापाशी मोजकेच कपडे आहेत— त्या साऱ्यांचं टिपण मी ठेवलं होतं. जेव्हा माझ्याकडं भरपूर कपडे होते तेव्हा उम्मानं त्यातले चोरले, अब्दुल खादरने चोरले, पात्तुम्मा अन आनुम्माही चोरायच्या माझे कपडे. तुमची बायको ऐशोम्मा अन अब्दुल खादरची बायको आनुम्मानंच तेवढी चोरी केली अशातला भाग नाही." त्याला मध्येच थांबवीत मी म्हणालो.

"ते धोतर अन खमीस अबूनं माझ्या हातातून हिसकावून नेलं. आपणच पहा माझी काय स्थिती झालीय ते !"

"त्या काडीपैलवानानं — अबूनं तुझ्यासारख्या तगड्या बलदंड माणसाच्या हातातून हिसकावून घेतलं ?"

"विश्वास नसेल तर अबीला विचारा, भाईजान ! अबी..."

अबी आला. हनीफाच्या साऱ्या गोष्टींना एकमेव साक्षीदार आहे अबी. आल्या-आल्याच तो म्हणाला, "बाप्पा जे सांगतायत ना, ते पाहिलंय मी !"

गोष्टी ह्या थराला पोहचल्या तेव्हा अर्धवट उघडलेल्या दारात उपस्थित झाली मांडीवर रवीदला घेतलेली ऐशोम्मा. ती म्हणाली, "बापलेक दोघंही सरळसरळ खोटं बोलताहेत. पोराला पढवीत होते ते सारं मी ह्या माझ्या कानांनी ऐकलंय, आपलं धोतर अन खमीस अबीच्या वाण्यांच्या पेटीत आहेत."

"चोर ! महाचोर ! अब्दुल खादरला अन मला तू लाकडांचं ओझं वहायला लावीत होतास, आठवतं का ?"

हनीफा उत्तरला, " ते मला काही माहीत नाही. मला कामं आहेत. रक्ताचं पाणी करून कष्ट उपसणारा मजूर आहे मी..."

" अन काय रे, तुझ्या केळीच्या बागा-बिगा तर आहेत ना ? " मी विचारलं.

तसं म्हणाला, " ती बाग हवी तर मी आपल्याला देऊन टाकतो. फक्त दहा हजार रुपये मला द्या की झालं."

मुळात सारी हजार रुपयांना तर ती बाग त्यानं विकत घेतली होती. चोर ! महाचोर !

मी उम्माला हाक मारली. उम्मा आली तसं मी तिला विचारलं, " हा हनीफा लहान होता, तेव्हा यानं पाच रुपये नव्हते चोरले ? हा लेकाचा मालकाच्या तोऱ्यात आम्हा दोघांना -- आपल्या थोरल्या भावांना -- डोंगराएवढाली लाकडं वाळत घालायची हमाली करायला लावायचा अन स्वत: मात्र आरामात खुशाल बसून राहायचा...चार-चार चक्रम[1] मजुरीदाखल रोज आमच्या हातांवर टिकवायचा. पाच दहा दिवसांनंतरच बाप्पांना हे सारं समजलं. चोरी मी केली असं म्हणून बाप्पांनी मला चोपलं होतं. आठवतं का हे सारं उम्मा ?"

उम्मा म्हणाली, " हनीफानं वडिलांच्या पेटीतनं काही चोरले नव्हते हे पैसे, त्या काळात पानाच्या डब्यात चांदीचे रुपये ठेवलेले असायचे. हा कसा चोरी करायचा, माहीत आहे ? नाही. मी नाही सांगणार. उगाच त्याची बायकोपोरं ऐकतील एखाद वेळी."

" सांग उम्मा ! ऐकू तर दे !"

मी ही गोष्ट मुद्दामच जरा वाढवीत नेली, कारण उम्माच्या पानाच्या डब्यातनं चांदीचे रुपये चोरणं हे तर माझं रोजचं काम होतं. उम्मा विश्रांतीसाठी जरा आडवी झाली की मी तिच्या पुढ्यात जाऊन झोपेचं सोंग करून उगाच पडून रहायचा. तिला जरा कुठं डोळा लागला की मी गुपचूप पानांच्या डब्यातनं चार चांदीचे रुपये काढून घ्यायचा अन डबा जिथल्या तिथं व्यवस्थित ठेवून तिथून सूंबाल्या करायचा.

उम्मा म्हणाली, " हा हनीफा मोठा झाला तरी अंगावरचा सुटला नव्हता. दूध प्यायला म्हणून पदराखाली माझ्या कुशीत मला चिकटून पडायचा अन चुरुचुरू दूध पिता पिता एकीकडं पानांच्या डब्यातनं पैसेही लंपास करायचा. एकदा मी त्याला

---

१. चक्रम—त्रावणकोर संस्थानात प्रचलित असलेले एक नाणे. अर्ध्या आण्यापेक्षा थोडय अधिक किंमतीचे. २८½ चक्रम = १ रुपया.

हातोहात पकडलं चोरी करताना अन मग असा काही चोप देऊन हाकललंय की विचारू नकोस. त्याच दिवसापासून त्याचं अंगावरचं पिणं मी पार कटाप करून टाकलं."

" भयंकर चोर ! अन अब्दुल खादरनं नाही वाटतं कधी चोरी केली ?"

" तोही करायचा. फक्त नाही कोणी कधी चोरी केली तर ती तू एकट्यानंच."

" वाहव्वा ! कित्ती चांगला आहे मी ! "

" पाहिलंस हनीफा ? पाहिलंस अबी, लैला, रषीद ? ऐकलं तुम्ही सर्व लोकांनी उम्मा काय सांगत्येय ते ?"

हनीफाला राहवलं नाही. तो म्हणाला, " उम्मा ! माझी लाडकी उम्मा ! तुला खरं म्हणजे काही आठवत नाही. पण केवळ ऐशोम्मा, आनुम्मा अन ह्या इतर साऱ्यांना काही तरी सांगायचं म्हणून आपली उगाच बनवून सांगत्येस झालं. हे आमचे थोरले भाऊसाहेबही तुझ्या पानांच्या डब्यातनं पैसे चोरायचे बरं का. मला चांगलं आठवतंय ते. मला अन छोटे भाईजानना बरोबर नेऊन बाहेर हॉटेलात चहा पाजायचे ते. चहाचे पैसे ते चांदीचे रुपये मोडून द्यायचे, माहीताय ? बडे भाईजानजवळ त्या काळात पैसे कुठून यायचे सांग तरी उम्मा. "

आता विषय वाढवण्यात हशील नाही हे मी मनोमन ओळखलं. विषय बदलीत मी म्हटलं, " तू वेळोवेळी माझ्याकडून दोन, तीन, पाच, दहा रुपये मागून घेतलेस. त्याव्यतिरिक्त शंभर रुपये उसने घेतलेस. याचे साक्षीदार आहेत तुझे सारे ख्रिश्चन, नायर, ईडव, दोस्त — त्या सर्वांना मी उम्माच्या समोर आणून उभे करतो. चल, टाक माझे शंभर रुपये. "

" उम्मा ! हे भाईजान काय म्हणतात हे ! मी यांच्याकडून पैसे घेतलेत ? यांच्यासाठी मी केळी, अननस वगैरे काय काय विकत आणलंय, यांच्यासाठी विड्या किती आणल्या त्याला तर सुमारच नाही. भाजीपाला, अंडी, बदकाची अंडी, मासळी — कित्ती म्हणून कित्ती विकत आणून दिलं त्याचा काही हिशेब ? या साऱ्या खर्चाचा विचार केला तर उलट हेच माझे चाळीस रुपये देणं लागताहेत. त्यांतले फक्त दहा रुपयेच मी आत्ता मागितले. फक्त दहा रुपये हं ! "

" हो हो, माहीताय, फार मोठा दातृत्ववान आहेस तू ते ! तुझ्या बागेतल्या झाडांची जमिनीवर गळून पडलेली चाळकीचिळकी फळं तेवढी तू मला दिलीस. बाकी सारी अब्दुल खादर अन सुलेमाननं पैसे देऊन विकत आणली अन केवळ तू इकडं यायचास म्हणून तुझ्या हाती वेळोवेळी धाडली. त्यानं दिलेली फळं तू मला पोहचती करायचास पण स्वतःची मात्र अशी समजूत करून घ्यायचास की जणू काही

त्यांसाठी स्वत:च्याच बेंबीला रग लागलीय ! आपल्याच कडोसरीचे पैसे खर्च झालेत ! "

एवढं ऐकलं मात्र, हनीफानं लगेच हाका मारायचा सपाटा सुरू करीत म्हटलं " अग, ऐशोम्मा ! जा जा, पोरांनाही बोलवून आण, आता ह्यापुढं आपल्याला इथं रहायचं नाही. आपण आपल्या जागेत फाटकंतुटकं झोपडं उभारून राहू. पण इथं नको. चला निघा ! आत्ताच्या आत्ता ! "

" थांब आता ! त्या शंभर रुपयांचा काय तो एकदा फैसल्ला लाव अन मग खुशाल जा कुठं जायचं असेल तिथं. उम्मा, ऐक हं. याच्याकडं तेव्हा चार सायकली होत्या. काही फार वर्षं नाही झाली ह्या गोष्टीला. मी इथं यायचो तेव्हा एखाद्या-अर्ध्या वेळी त्यातली एखादी सायकल न्यायचो. काम झालं की दहा मिनिटांनी परत करायचो. तरीही हा म्हणायचा दोन तास झाले सायकल नेऊन. म्हणजे ह्याच्या म्हणण्याचा अर्थ असा की मी त्याला दोन, तासांचं भाडं चुकतं करावं. याचे कित्येक नायर, ईडव अन ख्रिश्चन दोस्त होते. त्या सर्वांना घेऊन हा एरणाकुलमला माझ्याकडं यायचा. अबीला जशी खोटं बोलायची शिकवण यानं दिलीय तसंच खोटं बोलायची दीक्षा यानं आपल्या मित्रांनाही दिली होती. ते आल्या आल्याच ह्याच्या अडचणींचा पाढा माझ्या पुढ्यात वाचायला सुरुवात करायचे -- बिचारा हनीफा किती अडचणीत आहे म्हणून आळवून आळवून सांगायचे ! त्यांचं रडगाणं आटोपलं की मग हा गळा काढायचा. पैसे उसने मागायचा. अखेर मुलांसाठी अमुक न्यायचंय, तमुक न्यायचंय अशी सबब सांगून पाच रुपये मागायचा. मी तीन रुपये काढून द्यायचो. त्यांतल्या फार तर आण्याभराची लॉजेंजेस घ्यायचा हा मुलांसाठी

" त्या काळात सव्वातीनशे रुपयांना मी एक सायकल विकत घेतली होती. कुठून तरी त्याला ह्या गोष्टीचा सुगावा लागला. तसा एक दिवस आपल्या साऱ्या दोस्तांसह हा येऊन टपकलान काय माझ्याकडं. हा धरून चौघेजण होते -- पण आले होते मात्र तीन सायकली घेऊन. आल्या आल्याच धरणं धरून बसले -- हनीफाला माझी सायकल मिळावी ह्यासाठी ! हनीफाला माझी सायकल हवी होती ! ती दुकानात ठेवली तरच आपल्या इतर मोडक्यातोडक्या सायकली भाड्यानं जाऊ शकतील हे त्याचं म्हणणं. ह्या सायकलीची मला स्वत:लाच फार गरज आहे म्हणून समजावून सांगितलं मी. तर लगेच ह्याचे मित्र म्हणाले, हनीफा काय असेल ती किंमत रोख देईल तुम्हांला. आमचं बोलणं धड पुरंही झालं नाही तोच हनीफानं नोटांचं एक बंडल माझ्या पुढ्यात टाकलं. मी नोटा मोजल्या तर

ते सारे दोनशेचाळीस रुपये होते. बाकी ? वा: ! त्यांत काय — घरी पोहचताच तो धाडून देईल. तो बाकी पैसे पोहचते करील याची त्याच्या मित्रांनी हमी घेतली — त्यांच्या शब्दाला काहीच का किमत नाही ? पुन्हा त्याच वेळी हनीफानं दहा रुपये माझ्याकडून उसने म्हणून मागून घेतले — वर मुलांसाठी काही न्यायला म्हणून आणखी तीन मागून घेतले ते वेगळच. कित्येक महिने उलटलेत आता. बाकी पैशांचा पत्ता नाही. मी इथं आलो की ह्याचे मित्र मला पाहून तोंड लपवतात.

" चल, काढ...काढ ते बाकीचे पैसे. "

" मी फौजेतच चालता होतो कसा. "

अबी म्हणाला, " म्ही पण पौजेत जातो. "

लैलाही म्हणाली, " लैलाही फौजेत जाईल. "

ह्यावर ऐशोम्मा म्हणाली, " तर मीही रषीदला बरोबर घेऊन येईन. सरकारला रोटीतुकडा करून घालीन. "

" बस बस ! चूप बस जरा ! लागली आमच्यात येऊन उगा वटवट करायला ! बडे भाईजान इथं बसलेत म्हणून ! नाहीतर दोन दिल्या असत्या...! चल, हो आत ! " असं म्हणत म्हणत हनीफा शिवणकामाच्या दुकानावर चालता झाला.

थोड्या वेळानं रषीदा आणि सुबैदाला घेऊन उम्मा माझ्यापाशी आली. म्हणाली, " आम्ही जरा आंघोळीला जातोय. या पोरांना सांभाळ. "

मी मुलांना घेतलं. त्या साऱ्या आंघोळीसाठी निघून गेल्या. इकडं दोन्ही पोरांनी भोकाड पसरलं. त्यांचं रडणं बंद व्हावं म्हणून मी कोकराला उचलून आणलं अन त्यांच्यामध्ये खेळायला सोडून दिलं. दोन्ही पोरांनी मुती केली, कोकरानंही मलमूत्र विसर्जन करून देहशुद्धी उरकली. ह्या साऱ्या गोंधळात येऊन थडकला — शुचित्व गुरू थोर अबू महाराज ! आल्या आल्याच प्रश्न केला, " काय आहे हे सारं ? "

अबूनं पोरांचं रडणं बंद केलं. त्यासाठी त्यानं विशेष असं काही केलं नाही—फक्त पोरांवर डोळे वटारले, दातओठ खाल्ले, आरडाओरड केली, पात्तुम्माच्या शेळीला तडाखे लगावीत पिटाळून लावलं, मांजरीला मारलं, कोंबड्यांना उधळून लावलं !

ह्या साऱ्या गडबडीत संधी साधून मी कोकरानं केलेली घाण साफ केली. मलमूत्र गोळा करून बाहेर फेकून आलो. पोरांनाही उचलून अंगणात उभं केलं.

अबू म्हणाला, " पाहिलंत — शेळी, पोरं, कोंबड्या, मांजरं...साऱ्या साऱ्यांनी अंगणात अन पडवीत कशी घाण घाण करून सोडलीय — आपण हे सारं चालवून घेता. "

" मग काय करू मी ?"

" चोपलं पाहिजे धरून या साऱ्यांना..."

काडीसारखा किडकिडित अशक्त अबू आरडाओरडा अन मारझोड करणाऱ्यातला आहे. त्याला सारे टरकतातही. त्याच्या अंगावर पोरांना सोडून जायचा धीर त्यांच्या आयांनाच काय पण खुद्द उम्मालाही होत नाही.

" वडे भाईजान ! मी आपलं धोतर आणि खमीस चोरलंय, असं धाकटचा भावींनी सांगितलं ?"

तिनं सांगितलं की नाही ह्याविषयी मी हो ना काहीच बोललो नाही. त्याला काहीच सांगितलं नाही. तसा त्याला फणकारा आला –– म्हणाला, " प्रत्येकानं आपापला वाटा चोरलाय, मी एकटचानंच नाही, उम्मानंही, छोटचा भावींनीही. हे नाही ना त्यांनी सांगितलं ?"

" आनुम्मानं असं नाही म्हटलं की तू चोरलंयस म्हणून."

" मी एक धोतर अन खमीस चोरलंय अन हे मी कुठंही सांगायला तयार आहे. अखेर थोरल्या भाईसाहेबांनी मला काय दिलंय ?"

" तू ज्याच्यावर झोपतोस तो पलंग. त्याची किंमत आहे रुपये चाळीस. त्या पलंगावरची सतरंजी, गादी, उश्या, तू पांघरतोस ती काश्मिरी शाल, सारं काही. त्या एका शालीचीच किंमत पन्नास रुपये आहे. तू खिशाला लावून ऐटीत मिरव-तोस, ते पेन––पार्कर फाउंटन पेन––त्रेचाळीस रुपयांना घेतलं होतं मी.पुन्हा जेव्हा जेव्हा येतोस तेव्हा तेव्हा कित्येक वेळी पैसे ! ह्या साऱ्यांचा काही हिशोब आहे की नाही ?"

" हे सारं जुनं झालं. मागं केव्हातरी दिलंत, हल्ली येवढचात कधी काही दिलंत काय ?"

" ज्या ज्या वेळी ह्या साऱ्या वस्तू तुला दिल्या त्या वेळी त्या नव्याच होत्या ना?"

" भाईसाहेब, मला एक पंचवीस रुपये हवे आहेत."

" कशासाठी ?"

" हवे आहेत, काही काम आहे."

हनीफानं मागितले. अबूनं मागितले. आज काय विशेष आहे हे ? अबूला पैशाची खास जरुरी आहे अशातला भाग नाही. दहा-वीस धोतरजोडचा, सदरे, बनियन्स सारं त्याच्या पेटीत आहे. एक पेटीभर बूट–चपलाही आहेत. मोजून पाहिलं तर साठ जोड भरले, असं उम्मा सांगत होती.

आंघोळी-पांघोळी आटोपून साऱ्या बायका परत आल्या. तोपर्यंत घरची सारी पुरुष मंडळी जेवायला हजर झाली. दारात पाऊल टाकलं न टाकलं तोच अब्दुल खादर म्हणाला, " भाईजान, मला एक पन्नास रुपये हवे आहेत. फार गरज आहे बघा. "

" जा रस्ता सुधार ! "

हनीफानं पुन्हा आठवण करून देत म्हटलं, " मी फक्त दहाच रुपये मागितलेत हं ... "

मी काहीच बोललो नाही. एका तासानं रहस्य उलगडलं. पोस्टमन कुट्टन पिल्ला उंबरा ओलांडून आत दाखल होत म्हणाला, " आपली एक शंभर रुपयांची मनीऑर्डर आहे. "

कुट्टन पिल्लाच्या एका गालाला आवाळूसारखं काहीतरी झालंय -- आंब्याची कोय गालफडात दाबून धरावी तसा त्याचा तो गाल फुगीर दिसतो. त्या फुगीर भागावर नजर रोखीत मी त्याला विचारलं, " ही मनीऑर्डर आल्याचं आणखी कुणाकुणाला माहीत आहे ? "

" सर ! आम्हा सर्वांना ह्या गावात आयुष्य काढायचंय -- अब्दुल खादर अन हनीफाशी माझं वेळोवेळी फार काम पडतं. त्या दोघांनी सांगून ठेवलंय सर, की आपल्या नावानं कधी काही मनीऑर्डर वगैरे आली तर प्रथम आम्हांला वर्दी दे. "

" ठीक आहे -- नकोत हे पैसे मला -- कुट्टन पिल्लानंच घ्यावेत ते सारे. "

" वाः वाः ! हे असं कसं होईल ? "

" पन्नास अन पंचवीस अन एक दहा अन तीनदा पाच मिळून किती होतात ? "

" शंभर. "

" हाच ह्या पैशांचा हिशोब आहे. "

मी सारं काही कुट्टन पिल्लाला साफ साफ सांगून टाकलं. तसं तो म्हणाला, " सारे असेच असतात, सर. "

" हुं ऽऽ. सारे असेच असतात. काय षड्यंत्र ! काय कपटनाटक ! काय कट ! काय लूट ! "

कुट्टन पिल्ला आपल्या मुलीला सरस्वतीला कॉलेजमध्ये शिकायला पाठविण्याविषयी काहीसं सांगत होता तेवढ्यात मी फॉर्मवर सही करून टाकली. त्याच वेळी उम्मा अन आनुम्मा अशाच -- बस अगदी अशाच पडवीमध्ये येऊन बसल्या.

मी दहांची एक नोट पात्तुम्माच्या शेळीला द्यायला लागलो, तसं कुट्टन पिल्लानं विचारलं, " हे काय करताय, सर ? "

मी म्हटलं, "खाऊ दे तिलाही -- तिनं तरी काय पाप केलंय ! पात्तुम्माची शेळी आहे. दोनच दिवसांमागे व्यालीय -- "

कुट्टन पिल्ला हसत हसत निघून गेला.

उम्मानं विचारलं, "किती आहेत रे ? "

"माहीत नाही तुम्हांला ? "

काय सांगावं ! ते सारे पैसे त्याच दिवशी साफ झाले !

## ५

त्या दिवशी संध्याकाळी हनीफानं मला चहा दिला. सर्वसामान्यत: चहाचे पैसे अब्दुल खादर देत असतो. पितात हनीफाच्याच दुकानात बसून; पण त्या दिवशी चहाचे पैसे हनीफानं दिले.

हनीफा मोठा कवडीचुंबक आहे. त्याच्या दुकानात साधा एक दिवा कधी लावला जात नाही. त्याच्या दुकानाला अगदी लागूनच अब्दुल खादरचं टीनमेकरचं दुकान आहे. तिथं दहा-बारा पेट्रोमॅक्सच्या बत्त्या आहेत. एक ग्रामोफोन आहे. हां, हा ग्रामोफोन होता माझाच. पण उम्माच्या पुढ्यात रडून भेकून त्यानं तो माझ्याकडून मिळवला अन दुकानात नेऊन ठेवला. पेट्रोमॅक्स अन ग्रामोफोन गिऱ्हाइकांना भाड्यानं देण्यासाठी ठेवलेत. रात्री अंधार पडल्यावर काही काम निघालंच तर हनीफा अबूला हाक मारून म्हणे, "ती बत्ती जरा ह्या बाजला प्रकाश पडेल अशी नीट सरकवून ठेव बरं."

त्याच प्रकाशात हनीफा आपलं काम धकवून नेतो.

बसल्या बसल्या मी अब्दुल खादरच्या बाबतीत विचार करायला लागलो. तो नेहमीच आगीच्या जवळ बसलेला असतो. लोहाराची भट्टीच आहे त्याच्या दुकानात. सतत कष्ट उपसत असतो. त्याचे सारे केस पिकून पांढरे झालेत. काही लोक तर त्याची ही अवस्था पाहून त्यालाच माझा थोरला भाऊ समजतात.

त्यानं सर्वांत जास्त हिमतीनं उभारीनं कामं केली. आयुष्य काढलंय. मल्याळम् चौथ्या इयत्तेपर्यंत आम्ही दोघं बरोबरच शिकलो. त्यानंतर मी इंग्रजी शाळेत गेलो. अब्दुल खादर मल्याळम् सातवी इयत्ता उत्तीर्ण झाला तेव्हा मी कण्णूर जेलमध्ये नऊ महिन्यांची सक्तमजुरीची सजा भोगीत होतो. त्यासंबंधीची हकीकत माझ्या 'ओर्मा कुरिप्पु' (संस्मरण) नावाच्या पुस्तकात आलेली आहे. सजा भोगून मी गावी परत येऊन पाहतो तो, घरची सारी साधन-संपत्ती कर्जाच्या डोंगराखाली पार गाडली गेली आहे. घरात वेळेला दोन घास मिळायचीही वानवा आहे. अब्दुल खादर त्याच शाळेत शिक्षक म्हणून नोकरीला लागला आहे. ह्याच शाळेत पुतुश्शेरी नारायण पिल्ला सरांनी आम्हांला 'अ–आ' लिहायला शिकवलं होत.

एक वर्तमानपत्र काढावं ह्या उद्देशानं मी कोचीनला गेलो होतो. थोड्या दिवसांनी परत येऊन पाहतो तो –– अब्दुल खादर मास्तरकी सोडून एका विडीच्या दुकानात विड्या वळायला राहिलेला. एका सुपात पानं, धागा अन कात्री घेऊन बसायचा अन विड्या वळायचा. दिवसाकाठी जवळजवळ दोन-एक हजार विड्या वळायचा तो. एक-दीड रुपया त्यातनं कमवायचा तो

मी पुन्हा बाहेरगावी निघून गेलो. ह्या वेळी परत आल्यावर पाहतो तो त्यानं आपलं विड्या वळण्याचं कामही सोडून दिलंय. बाजारपेठेत एक छोटीशी खोली घतलीय... तिथं हा जोरात टिनाचं काम करतोय. पत्र्यापासून तो नाना तऱ्हेच्या वस्तू तयार करीत असतो. हे सारं काही कुणी त्याला शिकवलंय वगैरे अशातला भाग नाही –– आपल्याच बुद्धीच्या अन आपल्याच प्रयत्नांच्या बळावर तो हे सारं करायला शिकलाय.

त्या काळात मी साहित्यिक...म्हणजे लेखक वगैरे होऊन एरणाकुलममध्ये रहात होतो. १९३६–३७ साल होतं ते. मी खूप लिहायचा. दोन वेळची भ्रांत होती, तरीही आपला लिहीत असे. लिहिलेलं वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करायचा. छापून आलेल्या ह्या साहित्याची कात्रणं काढून ती क्रमवार व्यवस्थित जुळवून ठेवायचा. अशा तऱ्हेनं आयुष्यक्रम चालू असताना एक दिवस अब्दुल खादर लोखंडाची छडी टक–टक वाजवीत एक भलं थोरलं फौंटनपेन घेऊन माझ्याकडं आला.

"भाईजान ! ह्या वर्तमानपत्रातनं तुमचं काय काय छापून आलंय, ते जरा द्या बघू. वाचून पाहीन म्हणतो जरा !"

मोठ्या अभिमानानं मी माझी सारी साहित्यनिर्मिती त्याच्या हवाली केली. नंतर त्याच्याकडून चवली मागून घेऊन चहा प्यायला म्हणून बाहेर गेलो. त्याला मारं

वाचायला -- माझ्या साहित्यकृतीचा व्यवस्थित रसास्वाद घ्यायला भरपूर वेळ मिळावा म्हणून मी बराच वेळ इकडं तिकडं उगाच आपला भटकत राहिलो. त्याच्याकडून आणखी एक पावली उसनवार मिळवण्याची आशा मी मनात बाळगून होतो. ह्या विश्वविख्यात साहित्यकृतींचा जनक असा आपला थोरला भाऊच पैसे उसने मागतोय, हे जाणून ते तो निश्चितच देईल -- असा सारा विचार करून मी खोलीवर परत आलो — आणि दिसलं काय मला ? त्यानं वाचलेल्या साऱ्या लेखातील मजकूर आपल्या मोठ्या पेननं ठिकठिकाणी अधोरेखित करून ठेवला होता. हे सारं कशासाठी ? काय म्हणून ? मी एक विडी शिलगावून नेटका जरा कुठं खुर्चीवर टेकलो असेन नसेन तोच त्याची हाक कानी आली :

" भाईजान, जरा इकडं या ! "

काही जरुरीचं काम असेल अशा विचारानं मी जागचा उठलो अन त्याच्याजवळ चटईवर जाऊन बसलो. मोठ्या तुच्छतेनं त्यानं माझ्याकडं पाहिलं, मग एक वाक्य मोठ्यांदा वाचलं. वाक्य मोठं गंभीर आहे. पण त्यानं प्रश्न केला, " ह्या वाक्यात आख्यादम्[1] कुठं आहे ? " त्याच्या विचारण्याचा माझ्या डोक्यात काही एक प्रकाश पडला नाही. " आख्यादम् म्हणजे काय ? " एखाद्या शाळकरी पोराला व्याकरण समजावून सांगावं अशा थाटात त्यानं माझी बौद्धिक परीक्षा घ्यायला सुरुवात केली. त्या ओघात त्यानं ' आख्या ',[2] ' आख्यात ', ' विशेषण ', ' अन्वय ', अमुक तमुक — वगैरे व्याकरणविषयक चर्चा केली. त्यानं ' अमुक तमुक ' वगैरे काही म्हटलं नाही, पण अर्धा तास अस्खलित भाषण करून मी किती मूर्ख आहे हे सिद्ध करण्याचा मात्र त्यानं प्रयत्न केला. वर उपदेश, " भाईजान, थोडं व्याकरण शिका -- " नुसतं शिका असं सांगून थांबला नाही, तर व्याकरणाच्या काही पुस्तकांची नावंही त्यानं माझ्या तोंडावर फेकली.

मला आला राग. मी म्हटलं, " चल नीघ इथून ! घाल तुझी आख्या खड्ड्यात नेऊन ! तूप चोरून खाऊन अन आजारीपणाचं सोंग आणून भटकणारा चोर तू ! स्वतःला समजतोस कोण तू ? चोर कुठचा — बघ ! मी जे लिहिलंय ते सारं माणसं येरव्ही व्यवहारात जसं बोलतात तसं लिहिलंय. ह्यात तुझं ते भंपक ' आख्यातम् ' नसलं तर काय मोठं बिघडलं ! लंगडा कुठचा ! "

---

१. आख्यादम्—आख्यातम्, आख्यात—क्रिया, विधेय.

२. आख्या—संज्ञा, उद्देश्य, कर्तृपद.

ह्यावर त्यानं जे उत्तर दिलं ते मोठं मजेदार होत. तो म्हणाला, " भाईजान ! आपण हव्या तेवढ्या मला शिव्या द्या. माझी मुळीच हरकत नाही, मला त्याची मुळीच पर्वा नाही. खेद-खंत नाही. पण एक गोष्ट ऐका माझी. ही जी नावं सांगितलीत ना, व्याकरणाच्या पुस्तकांची ती आणून चांगला एक वर्षभर अभ्यास करा त्यांचा आणि मगच जे काही आपल्याला लिहायचं असेल ते खुशाल लिहा. "

" तू आपला आल्या वाटेनं चालायला लाग कसा !" मी म्हणालो -- " घरची सर्वांची मी चौकशी केली म्हणून सांग ! विशेषत: बाप्पा आणि उम्माला सांग मी त्यांची खुशाली विचारली म्हणून. मला अद्याप पैसे मिळायला लागले नाहीत, म्हणून काही पाठवीत नाही -- हेही सांग त्यांना. "

ह्याच्याजवळ एक पैसाही मी उसना मागितला नाही. धीरच झाला नाही. त्याचं ते रिकामटेकडं व्याकरण !

निघून गेले ते सारे दिवस. आता तो माझी सारी पुस्तकं मोठ्या आवडीनं वाचीत असतो, कधीकधी आम्हा भावाभावांपैकी कोणाकोणावर कथा वगैरे लिहावयासही सांगतो.

--" आपण फक्त लिहून द्या. ते छापायचं वगैरे मी पाहतो. "

हो ! छापील आणि पैसेही तोच खाईल ! महाचोर !

दुसऱ्या दिवशी ज्या वेळी पोरी तोंडाला सुटलेलं पाणी आवरीत माझ्या जांभळाच्या झाडाकडे पहात पहात रस्त्यावरून जात होत्या, त्याच वेळी पात्तुम्मा आली अन आपली शेळी न तिचं कोकरू घेऊन स्वत:च्या घरी निघून गेली.

" इथं कोणीही त्यांच्याकडे नीट पहाणार नाही, भाईजान ! अबू यांना पिटाळून लावील. पुन्हा उद्यापासून शेळीची धार काढून दूध विकायचंय. एका चहाच्या हॉटेलमध्ये दुधाचा रतीब घालीन म्हणून कबूल करून बसल्येय. "

खरी गोष्ट आत्ता बाहेर आली, शेळी घेऊन जायचं खरं कारण हे होतं.

पात्तुम्मा शेळी आणि कोकरू घेऊन गेली. त्यानंतर शेळी आणि तिचं कोकरू यायचं ते रोज सकाळी दहाच्या सुमाराला. कोकरू मजेत भटकायचं. इकडं तिकडं उड्या मारायचं, उंडारायचं. माझ्या बिछान्यावर यायचं. पोरांच्या पंक्तीत शिरून ताटात तोंड घालायचं. शेळीही पक्की हावरट, लोचट बनली होती. तीही पोराबाळांच्या पंक्तीत घुसून मिळेल त्यावर ताव मारयची. मग आरडाओरड अन धावपळ !

अशा प्रकारे काही दिवस निघून गेले. एक दिवस पाहिलं, घरात हसणंखिदळणं, मौजमजा, आरडाओरडा सारं काही मोठ्या खुशीत चाललेलं, अबी, पात्तुक्कुट्टी,

सैदू महम्मद, लैला, अरीफा वगैरेंना दुधाचा चहा प्यायला मिळाला आहे. पण म्हणून हे येवढं हसणंखिदळणं ? आरडाओरड ? मी हे सारं चाललं होतं तिकडे गेलो. दोन्ही आनुम्मा, उम्मा, ऐशोम्मा. साऱ्या मांडा घालून पूट्टूबरोबर दूध घातलेला चहा भुरकत होत्या अन वर मोठमोठ्यानं खिदळतही होत्या !

"काय उम्मा ! सारं हसणंखिदळणं अन कलकलाट कशासाठी ग ?"

"काही नाही. आपलं उगाच." उम्मा हसतहसत म्हणाली.

"भाईजान ! कोणाला सांगायचं नाही हं. आम्ही कोकरू बांधून ठेवलंय."

"बरं मग ?"

"आपण सांगणार तर नाही !

"अरे ! काय ते नीट प्रथम एकू तर दे !"

अब्दुल खादरच्या बायकोनं मध्येच तोंड घालीत सांगून टाकलं.

"आम्ही पात्तुम्माच्या शेळीचं दूध काढून घेतलं. पावशेर निघालं असेल जवळजवळ."

"हा काय प्रकार आहे, उम्मा ? तुम्ही लोकांनी चोरून पात्तुम्माच्या बकरीची धार काय म्हणून काढलीत ?"

उम्मा म्हणाली, "काय बिघडलं त्यात ? तिनं नको होती स्वतः आठवण ठेवायला ?"

आनुम्मा म्हणाली, "आपण सांगू नका हं. आमची पार अब्रू जाईल त्यात."

"गेली तर गेली अब्रू. मी उघड्या डोळ्यांनी तुमची ही चोरी स्वस्थपणं पहात बसू हो ?"

पात्तुम्मा आली तशी, मी तिला म्हटलं, पात्तुम्मा ! संभाळ ग ! तुझ्या शेळीचं दूध ह्या साऱ्यांनी मिळून धार काढून घेतलंय. कोकराला आधीच कुठं तरी बांधून ठेवलं होतं."

पात्तुम्माच्या अंगात जणू काय भूत संचारल्यासारखं झालं, "अरे, याच्या काळजात थोडी तरी दया-माया आहे ! आपल्या पोटच्या पोरांना असं बांधून ठेवाल का म्हणावं ! विचारा तरी जरा."

ती त्या बाजूला धावतच गेली. तिथं दोन्ही आनुम्मा, उम्मा, ऐशोम्मा, पात्तुक्कुट्टी, लैला, अबी, अरीफा तमाम सारी मंडळी उभी होती.

सारे जण एका सुरात म्हणाले, "छान झालं. आम्ही धार काढली. आणखीही पुन्हा धार काढू. शेळी अन कोकरू इथं पोसलं जातंय. आमची न्याहारी, आमच्या फणसाची

पानं, आमच्या भाताची पेज, आमच्या पोराबाळांचा भात खाऊन शेळी लहानाची मोठी झालीय, आम्हीच तिचं पालनपोषण करतो."

पात्तुम्मानं त्यांच्यात फूट पाडायचा प्रयत्न केला. म्हणाली, "अग आनुम्मा! तू माझी छोटी धाकटी बहीण आहेस ना! तुला मी एक शेळी नाही का बक्षीस दिली? उम्मा, उम्मा! आई ना तू माझी? ह्या भयंकर भावजयांना हाताशी धरून काय केलंत तुम्ही लोकांनी हे?"

उम्मा ताडकन् म्हणाली, "पुरे पुरे! तुझ्या भावजया, तुझी धाकटी बहीण, तुझी उम्मा – सर्वांनी मिळूनच दूध काढलं! आम्ही सर्वांनी मिळून चहा केला अन प्यालो. मोठ्या चवीनं प्यालो आम्ही हा चहा."

पात्तुम्मानं लगेच घोषणा केली, "आता ह्या घरात पाऊल ठेवणार नाही." तिनं कोकराला पटकन उचलून घेऊन छातीशी कवटाळलं, त्याला आंजारीत गोंजारीत प्रेमभरानं म्हटलं, "माझं लाडकं बाळ ते! तुझ्या हक्काचं दूध ह्या दुष्टांनी चोरून गिळंकृत केलं. चल मी तुला थंड पाणी पाजते.."

पात्तुम्मा कोकराला घेऊन माझ्यापाशी आली अन म्हणाली, "मी निघाले हं, भाईजान! पहात्ये आता माझ्या शेळीचं दूध कसं काय पितात ते!"

ती कोकराला घेऊन निघून गेली. मला बरं वाटलं. कोकरावाचून हे शेळीची धार कशी काढतील आता! वाः!

## ६

बरोबर दहाच्या ठोक्याला पात्तुमाची शेळी येते. थोड्या वेळानं पात्तुम्मा अन खदीजाही येतात. पात्तुम्मा रागावली बिगावलेली आहे की काय काही कल्पना नाही. भावजयांशी, बहिणींशी, उम्माशी – सर्वांशी बोलते. घरातलं काम करते. न्याहारी करते.–बिनदुधाचा चहा पिते. तिच्या शेळीला भाताची पेज पूर्ववतच दिली जाते.

कोच्चुण्णी आला तसं दुधाच्या चोरीबाबत जो प्रकार घडला त्याविषयी मी

त्याच्याशी जरा बोललो. तो म्हणाला, " मी म्हटलंदेखील होतं, की थोडंसं दूध देत जा. पण पात्तुम्मानं जाऊन काय केलं माहीत आहे ? चार घरी दुधाचा रतीब घालायचं पक्कं करून आली. चहाच्या हॉटेलशी दुधाच्या रतीबाचं मीही नक्की करून बसलोय. मला अन खदीजालादेखील चहात घालायला थेंबभर दूध देत नाही ती. "

एकंदर असा प्रकार आहे तर ? तर मग खदीजा अन कोच्चुण्णीसुद्धा वेळ पडली तर चोरी करायला मागंपुढं पहाणार नाहीत !

मी पात्तुम्माला विचारलं, " तू खदीजाला अन कोच्चुण्णीला थोडसं दूध का नाही देत ? "

पात्तुम्मा उत्तरली, " दूधविक्रीचा सारा पैसा खदीजाचे वडीलच घेतात अन मी म्हणतये, आजवर आम्ही सारे बिनदुधाचा चहाच पीत आलो ना. मग आताच कशाला त्याचा नसता लोभ ? मी स्वतःतरी दुधाचा चहा घेते का ?"

" तू महा चिक्कू आहेस ! "

" खदीजाच्या वडिलांनी एका चिटफंडात नाव घातलंय. त्यात वेळच्यावेळी भरायला पैसा हवाय की नको ?"

हेही ठीक आहे म्हणा ! असा पोक्तपणं विचार करीत जरा कुठं बसलो होतो, तेवढ्यात सुलेमाननं तीन अननस आणून मला दिले. म्हणाला, " विलायती अननसं आहेत ही, भाईजान फार चांगली असतील बघा ! "

त्यातलं एक मी कापलं. एक एक फोड पोरांना वाटून दिली. मीही एक खायला घेतली तितक्यात आपल्या साऱ्या आढ्यतेसकट अबू तिथं प्रविष्ट झाला.

" वा ! पाहिलंत ! माणूस पैसेवाला असला की, असंच सारं काही लाभत असतं बरं, "— त्यानं म्हटलं, " माझ्या सारख्याला कोण अननस देणार ? आज आपल्याला मोठी मेजवानी द्यायची तयारीही जोरात चालू आहे. "

" मेजवानी अन ती कशाची ?"

" बिर्याणी, पत्तिरी[1], चहा... !"

" तसं असेल तर तूही चल माझ्याबरोबर. "

" मला काही कोणी बोलावलं नाही. असो, आपण एक गोष्ट ऐकलीत का ?— आपल्या त्या महान चिक्कू बहिणाबाईंनी काल छोटे भाईजान अन हनीफाला चक्क दुधाचा चहा पाठवला होता, दुधाचा चहा... ! "

---

१. पत्तिरी—तांदळाचे पीठ नारळाच्या दुधात मळून केलेली भाकरी.

" दुधाचा चहा ?

" हो ना. "

" का ? तुला नाही वाटतं दिला ?"

" मी शेजारीच बसलो होतो, तेव्हा मलाही एक सिंगल चहा मिळाला म्हणा.

मोठं नवलच म्हटलं पाहिजे ! अब्दुल खादर, हनीफा अन त्याच्याच जोडीला" अबूलाही पात्तुम्मानं दूधाचा चहा धाडला होता ! ह्या साऱ्यांच्या पाठीशी काहीतरी रहस्य निश्चितच आहे !

" पात्तुम्मानं दुधाचा चहा पाठवला याचं कारण ?"

" हनीफा भाईजाननं संप पुकारलाय ना ! "

" संप ? अन तो काय म्हणून ? कशासाठी ?"

" हनीफा भाईसाहेब आजवर थोरल्या आक्काचं लांब बाह्यांचं पोलकं, खदीजाचं खमीज कुडतं शिवून देत असत. वर पुन्हा त्यांचे काही फाटकेतुटके कपडेही व्यवस्थित शिवूनसावून द्यायचे. काल परवा काही शिवून घ्यायला म्हणून खदीजा त्यांच्याकडं गेली तर सरळ 'मला वेळ नाही' म्हणून सांगितलं त्यांनी तिला. ह्यापुढं त्यांनी असलं काही बोलू नये, म्हणून चक्क लाच आहे हा दुधाचा सिंगल चहा... "

" अन अब्दुल खादरला जो दिला तो कशासाठी ?"

" थोरल्या जीजासाहेबांनी[1] छोट्या भाईजानकडून काही रक्कम कर्जाऊ घेतलीय. भाईजाननी भाबीसाहेबांना स्पष्ट सांगितलं की पैसे ताबडतोब मिळाले नाहीत तर सरळ दावा दाखल करीन मी कोर्टात. पहिले प्रतिवादी जीजासाहेब, दुसरे थोरल्या ताईसाहेब अन तिसरी खदीजा. त्यांची शेळी जप्त करून नेली जाईल. हे सारं त्यांनी करू नये, एवढ्याचसाठी होता तो दुधाचा सिंगल चहा .. "

" अच्छा, म्हणजे अशा प्रकारे लाच वगैरे देण्यासाठी उपयोगी पडतं तर पात्तुम्माच्या शेळीचं दूध !"

अबू म्हणाला, " कुट्टन पिल्ला येताना दिसतोय. "

खरं आहे. पोस्टमन कुट्टन पिल्ला दारातनं आत आला अन त्यानं एक पार्सल माझ्या हाती दिलं. मी सही करून पावती दिली. पोस्टमन निघून गेला तरी मी पार्सल उघडलं नाही. उम्मानं विचारलं, " काय आहे रे, त्या बंडलात ?"

मी म्हटलं, " माझ्या नव्या पुस्तकाच्या दहा प्रती आहेत, ज्यांनी हे पुस्तक

---

१. जीजा-वडील बहिणीचा नवरा.

छापलंय त्यांनी ह्या माझ्यासाठी म्हणून धाडल्यात. समजलं ?"

"विकल्या ह्या प्रती तर पैसे बियसे मिळतील ?"

"आपण जा जरा इथून ! सदान् कदा पैसे ! पैसे ! पैसे !"

त्या क्षणी माझ्याजवळ एक दिडकीदेखील शिल्लक नव्हती. एक छदाम नव्हता हाताशी. मनात एक विचार सहज तरळून गेला. उम्मा परसदारी गेली तशी मी गुपचूप अबूला हाक मारली. म्हणालो, " ही पुस्तकं बाजारात नेऊन विकू शकशील का ? "

त्यानं फाडकन प्रश्न केला, " काय कमिशन द्याल मला ?"

" देईन बाबा, देईन काहीतरी... " असं म्हणून नऊ प्रती कागदात व्यवस्थित बांधून अबूच्या हाती दिल्या अन त्या तो विकून परत येण्याची वाट पाहात बसलो.

" माझंच गाव, मीच लिहिलेलं पुस्तक, कोणी पैसे देऊन ते विकत घेईल का ? "

एक-दोन तास असेच गेले. मग अबू आला. याला म्हणतात नशीब ! सारी पुस्तकं विकली गेली होती. एका प्रतीची पूर्ण किंमत कमिशनादाखल अबूला दिली अन बाकी पैसे मोजीत होतो तेवढयात, " किती पैसे मिळाले रे ? " असं विचारीत उम्मा तिथं येऊन दाखल झाली ! मला अस्सा राग आला. जवळच एक ग्लास पडला होता, तो घेतला अन थाडकन दिला फेकून समोरच्या भिंतीवर. तशा त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. सारं घर एकदम स्तब्ध, शांत, निवांत झालं. मलाही खूप स्वस्थता मिळाली. शांतता लाभली. उम्मानं आपले गुपचूप ग्लासचे सारे तुकडे एकत्र गोळा केले, नीट झाडून काढलं अन तो कचरा कागदात गुंडाळून घेऊन ती तिथून निघून गेली. कचरा दूरवर फेकून ती परत आली अन माझ्याच समोर पश्चिमेकडं पहात बसून राहिली. माझ्या जवळची उरलेली एक प्रत ' विश्वविख्यात माय मूक्कू ' पात्तुम्माच्या शेळीसमोर धरली तशी ती मोठ्या आशेनं जवळ आली.

" हे काय भाईजान ? " अबूनं विचारलं.

मी म्हटलं, " ' बाल्यकाल सखी ' अन ' शब्दङ्डल ' ही दोन्ही पुस्तकं ह्या शेळीनं मोटया चवीनं खाल्ली. त्याच वेळी मी तिला म्हटलं होतं की मी तुला आणखी पुस्तकं देईन. तेव्हा आता तिला हे ' विश्वविख्यात माय मूक्कू ' हे पुस्तकही खाऊन पाहू दे."

" तिला नका घालू खायला – " अबू म्हणाला. तसं मी उठलो अन पुस्तक पेटीत ठेवून दिलं. अबू गेल्यावर पुस्तकविक्रीचे जे काही पैसे आले होते त्यातले निम्मे मी उम्माच्या ओटीत घातले. "

उम्मानं विचारलं, " एका पुस्तकाचे किती पैसे मिळतात ? "

खरं होतं ते तिला सांगून टाकलं.

थोड्या वेळानं अब्दुल खादर जेवायला म्हणून आला. माझ्या जवळ जी एक प्रत उरली होती ती त्यानं घेतली अन म्हणाला, " बंडल तर बरंच मोठं होतं पार्सल आलं तेव्हां ? "

" एकूण दहा प्रती होत्या त्यात. त्यांतल्या नऊ अबूच्या करवी विकून टाकल्या. एका प्रतीचे पैसे अबूला दिले. उरलेल्यातले निम्मे उम्माला देऊन टाकले. "

" म्हणजे मग मला काहीच नाही का ?"

" आहे ही प्रत घे अन विकून काय मिळेल ते घे. "

" उम्मा ! " अशी हाक मारीत तो आत गेला. तिथं काहीतरी गडबड चालल्याचं कानी पडलं. अब्दुल खादरचे शब्द कानांवर आले. तो म्हणत होता, 'इथला सारा खर्च मी चालवतोय. तुम्ही नाही...' थोड्या वेळानं तो तिथून खुशीत बाहेर पडला. आपल्या कामाला निघून गेला. उम्माचा चेहरा पहाताक्षणीच मला कल्पना आली की तिच्या जवळ जे काही थोडेबहुत पैसे होते ते सारे अब्दुल खादर गिळंकृत करून घेऊन गेलाय.

संध्याकाळी चारच्या सुमारास कोच्चुण्णी अन खदीजा मला बोलवायला आले. अबूला बरोबर घेऊन मी त्यांच्याकडे गेलो.

कोच्चुण्णीच्या घरात त्याचे वडील, उम्मा अन बहीण आहेत. पात्तुम्मा, कोच्चुण्णी अन खदीजा यांसाठी शेळी, तिची कोकरं, कोंबड्या वगैरे बरोबर आरामात राहण्यासाठी एक फाटकी तुटकी झोपडी आहे, असं कोच्चुण्णीनं सांगितलं.

" त्याच्या बाबतीत आपल्याला काही कळू नये, अशीच पात्तुम्माची इच्छा आहे. परंतु आपण हे पहायलाच हवं. " अबू हलकेच मला म्हणाला.

पत्तिरी अन कलेजीचं कालवण मी पोटभर खाल्लं, दूध घातलेला चहाही प्यालो. पात्तुम्माचं घर पाहिलं.

पात्तुम्मानं दीनतेनं विचारलं, " भाईजान का आलात असं इकडं ? " तिच्या घरची अवस्था मोठी दयनीय आहे. कुडाच्या भिंतींवर ताडाच्या झावळ्या आच्छादलेली एक छोटीशी खोली, तिची दारंदेखील अशीच जुनीपुराणी दुसऱ्या कुठल्या घराची काढून लावलेली आहेत...लावलेली आहेत म्हणजे थोरखंडानं कशीतरी बांधून उभी केली आहेत. कडी, कोयंडा, कुलूप काही एक नाही त्या दारांना.

" फार लाज वाटते हो माझी मला, " पात्तुम्मा म्हणाली, " वाटतं असं लाजिर-

वाणं जिणं जगण्यापरीस मरून जावं. काय उपयोग आहे असं जगण्याचा...?"

"काही हरकत नाही, पात्तुम्मा ! हे दार दुरुस्त करायला जो काही खर्च येईल तो मी देईन."

"नाही, भाईजान! मी आपल्या शेळीचं दूध वगैरे विकून घेईन करून ते दुरुस्त."

"नाही–नाही, मीच देईन त्याच्या दुरुस्तीचे पैसे."

त्या दिवशी रात्री मी आपल्या घरी पश्चिमेकडे तोंड करून बसलो होतो. कोच्चुण्णी, सुलेमान, पात्तुम्मा सगळे तिथं होते.

अब्दुल खादरने हनीफाला म्हटलं, "बघ ! उद्या सकाळी अगदी लौकर जायचंय. कचेरी उघडताच दावा दाखल करून येऊ या परत."

मी विचारलं, "कसला दावा ?"

"एक दिवाणी दावा. लगेच एक जप्तीही. फार दिवसांपासून टाळत आलो होतो हे करायचं मी. पण काही गोष्टी अशा घडल्या की आता हे लांबणीवर टाकता येणं शक्य नाही मला."

"काय घडलं असं ? कसल्या गोष्टी म्हणतोस ?"

"गरमागरम पत्तिरी नारळाच्या दुधात बुडवून थाळीत ठेवली तेव्हा नाही आली आमची आठवण ! कलेजीचं कालवण वाडगे भरभरून वाढलं तेव्हाही नाही आठवण आली आमची ! आम्हांला फक्त एक सिंगल चहा अन इतर कुणाला मात्र पत्तिरी आणि कलेजी !"

आनुम्मा म्हणाली, "मी, उम्मा अन भाभीदेखील तोंडाला सुटलेलं पाणी आवरीत इथं बसलो–पण आमचीही आठवण नाही आली कुणाला !"

सुलेमाननं विचारलं, "अन मी ! माझं काय ?"

अब्दुल खादर म्हणाला, "सुलेमान ! तू पहिला साक्षीदार !"

पात्तुम्मा–"या अल्लाह ! आम्ही कुणा कुणाला म्हणून घाबरायचं ? उम्माला भिऊन दबून तर रहातोच आहोत, भावजयांना, धाकट्या बहिणींना, धाकट्या भावांना, हनीफाला, अबूला, पुन्हा स्वतःच्या नवऱ्यालाही भिऊन दबून आहोत ! अन आता सुलेमानलाही !"

"मला घाबरायचं कुणाला मुळीच काही कारण नाही–" अबू जोरानं खेकसला.

"चूप !" मी त्याला दरडावीत उद्गारलो.

पात्तुम्मा म्हणाली, "छोटे भाईजान ! मी सर्वांना मेजवानी देईन. चहाही देईन. थोडे दिवस जरा धीर धरा."

" थोडे म्हणजे आणखी किती दिवस ? " त्यानं विचारलं.

" मी सांगेन तुम्हांला, भाईजान ! पण काय रे हनीफा ! तू असं वागावंस ? खदीजाचे कपडे न शिवता परत करावेत ? "

हानीफानं उत्तर केलं, " मी आयुष्यभर असंच फुकटात शिवत राहू काय ? अबूचं खमीस शिवायचंय. ह्या घरातल्या साऱ्यांचे कपडे शिवायचेत पण कुणी मजुरी देतंय का मला त्याची ? "

अब्दुल खादरनं म्हटलं, " तुझ्या बायकोचे कपडे शिवायचे पैसे मी देऊ ? लैलाचे परकर पोलकं शिवायचे पैसे मी देऊ ? अबीची कोट पॅन्ट शिवलीच तर त्याचेही पैसे मीच देऊ ? भले शाब्बास !

हनीफा नाराज झाला – म्हणाला, " मला कुणीच काही देऊ नका. मी आपला लष्करातच भरती होतो कसा. आजच्या आजच रात्री चालता होतो इथनं– "

मला एक गोष्ट आठवली. मी म्हटलं, " हे बघ ! एक अर्ध्या घंटयानं जा लष्करात. कित्येकदा रजेवर घरी यायचास तेव्हा अर्णाकुलम्ला माझ्याकडं येत होतास की नाही ? त्या काळात नेहमी माझ्याकडनं पाचदहा रुपये हातउसने घ्यायचास. आपल्याकडं होते ते सारे पैसे, उम्मानं घेतले, अब्दुल खादरनं घेतले वगैरे वगैरे सवबी सांगायचास तू मला त्या वेळी. त्यांतली एक दमडीही तू मला आजवर परत केला नाहीस. चल दे आता ते सगळे पैसे माझे मला परत ! "•

हनीफानं तावडतोब ऐशोम्माला हाक मारली. म्हणाला, " चल, नीघ ग ! पोरांनाही हाका मार ! ह्या घरात आता आपल्याला रहायचं नाही. राह्यलो तर लोक सरळ डोक्यावर बसतील आपल्या. आपण आपले आपल्या जागेत जाऊ. झावळ्याविवळ्यांचा अडोसा करून राहू कसे तरी. ऊठ रे ! अबी ! "

मी विचारलं, " तू माझ्या जवळून पैसे घेतले होतेस की नाही ? " त्यानं उत्तर दिलं, " ते तर सारे त्या दिवसांत घेतले होते ना, भाईजान ? आता कुणाला आठवतंय ते इथं ? "

" ठीक आहे ! घेतले होतेस एवढी तरी गोष्ट निश्चित आहे ना ? पुरे आहे तेवढं ते मला– "

मी जाऊन झोपलो. सकाळी भल्या पहाटे चारलाच पात्तुम्मा, कोच्चुण्णी अन खदीजाची जायची गडबड कानावर पडली अन जाग आली, पण मी तसाच पडून राहिलो. उम्मानं विचारलं, उठलास का रे तू ? "

मी म्हणालो, " आहे, जागाच आहे, पडलोय जरा. काय आहे ? "

खिशात पैसे असतील तुझ्या तर जरा एक रुपया दे. कुणाला समजता नये हे हं ?"

" कालच तर दिले होते ना पैसे ? "

" ते सारे अब्दुल खादरनं घेतले. घर तोच सांभाळतो ना ! किती जणांचा खर्च चालवतोय ! रोज किती पैसे लागतात घरखर्चासाठी याचा जरा काही विचार तर कर ! "

" आता जा इथून. आणखी एक शब्द अधिक बोलशील तर मी सरळ इथून आपला रस्ता सुधारीन... "

उम्मा गप्प बसली. मीही उगाच पडून राहिलो बिछान्यात. एक जुनी गोष्ट आठवली.

त्या काळात त्या दुसऱ्या छोटया घरात मी राहात असे. एका टॅक्सीतनं मी आलो होतो. टॅक्सी घरासमोर येऊन उभी राहिली तशी बरीचशी मंडळी भोवती गोळा झाली. ड्रायव्हरला नोटा मोजून दिल्या, ते साऱ्यांनी पाहिलं.

त्या दिवशी जेवून जरा वामकुक्षी करावी म्हणून अंग टाकलं, तेवढ्यात अब्दुल खादर, उम्मा अन हनीफा आले. आल्या आल्याच अब्दुल खादर म्हणाला, " भाईजान ! जवळ रुपये असतील तर ते माझ्या हवाली कर. इथं जवळ अंगावर ठेवण्यात अर्थ नाही. कुणी चोर येऊन लांबवील... "

मी पाचशे रुपये मोजून उम्माच्या देखत त्याच्या हवाली केले. चोर येऊन प्राण घेईल, पण पैसे तर सुरक्षित राहतील ? सारीजणं संतुष्ट होऊन आल्या पावली परत गेली. मी शांतपणे अंथरुणावर पसरलो. आरामात एक बिडी शिलगावली तेव्हा मला घरात कुणीतरी वावरत असल्याचा भास झाला. थोडा भेदरलोच मी. धीर धरून विचारलं, कोण आहे ते ? "

" मीच आहे रे ! गुपचूप आल्ये होते मी– "

" काय काम आहे ? "

" हे बघ, ह्या कानाचं त्या कानाला कळता कामा नये – तू मला एक पंचवीस रुपये दे पाहू. कुणाला पत्ता लागायला नको याचा. "

उम्मा होती ना ती ? मी पंचवीस रुपये काढून तिच्या हातावर ठेवले अन मग निवांतपणे झोपलो. दुसऱ्या दिवसापासून रांगच लागली उसनवार पैसे मागणाऱ्यांची ! त्यात अधिक भरणा होता तो बायकांचा. सगळ्याच मुसलमान होत्या अशातलं नव्हे पण साऱ्यांनी मला अंगावर पाजलं होतं ना लहानपणी ! " बेटा विसरलास तू ? मला दोन रुपये दे ना. "

दोन, चार, पाच – असं करता करता जेव्हा आकडा शंभराच्या घरात गेला, तेव्हा "नाही, मी कुणाचंच दूध प्यालो नाही बाळपणी." असं म्हणून स्वस्थ बसून राहिलो. ह्या साऱ्याच्या जोडीने आणखी एक गोंधळ चालू होता. अबी अन पातुक्कुट्टीला घेऊन उम्मा यायची अन म्हणायची, "या पोरांना काहीतरी दे रे– पण तांब्याचं नको देऊस."

एवढंच नाही.

"ऐक ! तू इथं रहायला आला आहेस. आता तुला भेटायला तुझी दोस्त मंडळी येतील ना ? त्यांना जेवाय-खायला कशात वाढायचं ? भांडी नकोत का त्याच्यासाठी ?"

"भांडी कशाला ? केळीची पानं चालतील त्यांना..."

"शी: शी: ! किती लाजिरवाणं आहे ते ! पाहुण्यारावळ्यांना कुणी केळीच्या पानांवर का वाढतं भिकाऱ्यासारखं ! थोडीफार ताटं-थाळ्या, प्लेटी-बश्या, ग्लासं– सारं काही हवंच."

"माझ्या जवळ पैसे नाहीत हे सारं आणायला."

"तर मग त्या आनप्परंब[1]च्या दुकानातनं तू सांगितलंयस असं सांगून विकत आणत्ये उधारीनं."

म्हातारी तसं केल्यावाचून राहणार नाही आनप्परंबच्या वंकिकुञ्जू[1]चे एक मोठे दुकान आहे. तो माझा मित्रही आहे. ती स्वत: दुकानात गेली तर ते अख्ख दुकानच्या दुकान खाली करून आणायला तिला कसला संकोच वाटणार नाही की ती कशासाठी म्हणून मुळीच मागंपुढं पाहणार नाही. मला याची पुरेपूर जाणीव होती म्हणून मी लगेच म्हटलं,– "नाही उम्मा, तू नको जाऊस. मी स्वत:च आणून देईन."

स्वत: जाऊन मी बरीचशी भांडीकुंडी घेऊन आलो. तेवढा एक दिवस मला जरा निवांतपणा मिळाला. नंतर उम्मा म्हणाली, "बेटा ! आता तू इथं रहायला आलायस. तुझे मित्रबित्र आले तर कुठं झोपतील ते ? काही चांगल्या चटया अन उश्याबिश्या आणून टाक."

"उम्मा ! जा बघू आता इथून..."

पण काय सांगू ! मागचा त्रास चुकावा म्हणून मी ते सारं विकत घेऊन दिलं. त्याच वेळी उम्माला एका तांब्याच्या हंड्याची गरज लागली. म्हणाली, "कुठून

---

१. हे या घराण्याचे नाव. व्यक्तीचे नाव—वंकिकुञ्जु. पूर्ण नाव—आनप्परंब वंकिकुञ्जु.

थोडं भात मिळालं तर कशात उकडणार ते ? आंघोळीसाठी पाणी तापवायलाही उपयोगी पडेल हंडा."

मी मनाशी म्हटलं – तांब्याच्या हंड्यानंतर बैलगाडी. मग मोटर कार. ङ् हूं !

पेटीवळकटी उचलली अन सरळ मी चालू लागलो. प्रथम वर्कल्याला गेलो, तिथून मद्रासभर भटकून परत आलो. पुन्हा गेलो. पुन्हा आलो. हनीफाच्या ' फौजेत दाखल होतो आत्ताच्या आत्ता ' सारखा प्रकार नव्हता हा. जाणार म्हटलं की मी सरळ उठून चालता होत असे. म्हणून उम्मा आपली चूपचाप स्वस्थ बसून राहिली. मी ताड्कन उठलो अन ट्रंक उघडली. शिल्लक उरले होते ते सारे पैसे उम्माच्या हातावर ठेवले अन म्हणालो, " आता घाबरायचं, भ्यायचं काही एक कारण नाही. जायचा विचार मनात आला तरी आता जाता येणं शक्य होणार नाही मला. राहण्याच्या खर्चासाठी आता माझ्याजवळ एक दमडी शिल्लक उरलेली नाही. आता माझंही खायप्यायला घालून पालनपोषण करा ! "

अशा प्रकारे एक एक दिवस मागं पडत होता.

मग एक अद्भुत[१] गोष्ट घडली. पात्तुम्माच्या शेळीची आनुम्मा अन ऐशोम्मा अशा दोघींनी मिळून कोकरू दाखविल्यावाचूनच धार काढली. अन दूध घालून चहा प्याल्या. एक दिवस नव्हे रोजच्या रोज अशी चोरून धार काढली जाऊ लागली. कोकराविना शेळी पान्हावणार नाही, दूध देणार नाही अशी मनोमन खात्री असल्यामुळे पात्तुमा स्वस्थपणे जीवन व्यतीत करीत होती.

अबी अन पातुक्कुट्टीला कोकराऐवजी शेळीपुढं धरून पाहिलं पण उपयोग झाला नाही. शेळी पान्हावलीच नाही. अखेर सुबैदा आणि रषीदला धार काढताना शेळीपुढं धरलं... हे लोकविलक्षण कृत्य पात्तुम्माच्या कानी गेलं तशी ती ऊर बडवीत धाय मोकलून रडली.

" अरे काही माणुसकी तुम्हांला ! असं कसं केलंत तुम्ही ! कशी फसवणूक केलीत तुम्ही त्या मुक्या जनावराची ! नका, नका; अशी माणुसकी सोडू नका ! असं काही करू नका. मी देईन दूध तुम्हा सर्वांना...पण माणुसकी सोडू नका ! "

दुसऱ्या दिवसापासून पात्तुम्माकडनं अर्धी बाटली दूध यायला सुरुवात झाली

---

१. अद्भुत अशा अर्थाने की केरळमध्ये बछडा दाखविल्याविना जनावराची धार काढायची पद्धत नाही. कोकरू, वासरू पुढ्यात नसेल तर शेळी किंवा गाय पान्हावत नाही अशी समजूत तिथे प्रचलित आहे आणि म्हणूनच कोकराच्या ऐवजी सुबैदा आणि रषीदला धार काढताना शेळीच्या पुढे धरण्याची युक्ती काढली गेली.

सुबैदा, रषीद, अबी, अरीफा, लैला अन पात्तुकुट्टी या सगळ्यांची चांगलीच चंगळ झाली. आनुम्मा, ऐशोम्मा, उम्मा—साऱ्यांना दुधाचा चहा मिळत असतो हल्ली. आजकाल आता शेळीबरोबर तिचं कोकरूही येत असतं. त्यांच्या बरोबरच अर्धी बाटली दूध घेऊन खदीजाही येते.

आता आमच्या घरी दोन प्रकारचं दूध मिळतं. एक असतं चोरूनमारून धार काढलेलं अन दुसरं पात्तुम्मानं आपण होऊन पोरीबरोबर पाठविलेलं. बिचारी पात्तुम्मा !

एक रहस्य अद्याप मला उलगडलं नाही ! ह्या बायकांपैकी कुणाच्या डोक्यात ही कल्पना प्रथम स्फुरली ? प्रथम ही अक्कल कुणाची ? ही बुद्धी कुणाची ?

१

सुहरा अन मजीद बालपणापासूनच एकमेकांचे मित्र होते. त्यांच्या मैत्रीबाबत एक गोष्ट विशेष अशी की परिचय होण्यापूर्वी ते एकमेकांचे भयंकर शत्रू होते. ह्या शत्रुत्वाचं कारण काय ? तर ते शेजारी होते. दोघांच्याही कुटुंबात परस्परस्नेह-संबंध होते. पण सुहरा अन मजीद मात्र एकमेकांशी शत्रुत्वाच्या नात्यानंच वागत होते. सुहरा सात वर्षांची होती, मजीद नऊ वर्षांचा. एकमेकांना चिडवणं, तोंड वेडावून दाखविणं अन भीती दाखविण्याचा प्रयत्न करणं याची त्यांना जणू खोडच लागली होती.

अशा परिस्थितीत आंब्यांचा मोसम आला...कैऱ्या पाडाला लागू लागल्या. सुहराच्या घराजवळच्याच एका झाडाचे आंबे चांगले पिकून पाडाला लागून टपाटप खाली पडायला सुरुवात झाली. पण त्यातला एकही आंबा तिच्या हाती लागत नव्हता. आंबा पडल्याचा आवाज कानी येताच ती धावत धावत जायची. पण तिथं जाऊन पहावं तर–मजीद आपला तोच आंबा चोखून खात असलेला उभा. सुहराला आंबा द्यायचं तो कधी नाव काढायचा नाही अन यदाकदाचित द्यायचाच झाला तर आपला अर्धा उष्टा खाऊन झालेला आंबा तिच्यापुढं करायचा अन चुकून-माकून तो घेण्यासाठी सुहरानं हात पुढं केलाच तर तो आंबा द्यायच्या ऐवजी आपल्या हाताचे कोपरे तिला दाखवून म्हणायचा, " घे, खाऊन टाक ! " पुन्हा कधी भेट झाली, की तिच्यावर डोळे वटारीत जीभ काढून तिला भीती दाखवायचा. सुहरा

ह्या साऱ्याला भीत वा घाबरत होती असं नव्हे. तीही त्याला त्याच थाटात व्यवस्थित जबाब द्यायची. हे सारं असं असलं तरीही आंब्याच्या बाबतीत सुहराला हार खावीच लागायची.

तिला आंबा का मिळायचा नाही ? वारा असो – नसो, सुहरा त्या आंब्याच्या झाडाखाली सदैव उभी असायची. पण वरून काही पडेल ? नाव नको ! साधं एक पान नाही पडायचं खाली कधी ! झाडावर पाडाला आलेले बरेचसे आंबे आहेत हे तिला पुरेपूर माहीत होतं. पिकलेले आंबे आपण होऊन पडत नसतील तर झाडावर चढून ते तोडायला हवेत; पण त्यावर तर खूपखूप लाल मुंगळे आहेत. चावून चावून जीव नकोसा करतील. समजा, हे चावरे मुंगळे झाडावर नसते तरी झाडावर चढणं वगैरे शक्य का होतं तिला ? बोलून चालून ती पडली मुलगी.

तोंडाला सुटणारं पाणी कसंबसं आवरीत एक दिवस अशीच ती त्या आंब्याच्या झाडाखाली उभी होती तोच फांद्याफांद्यांतून आडत आदळत काहीतरी बद्द करून खाली आदळलं. ओहो ! सुहरा त्या दिशेनं झटकन धावत गेली. आनंदभरानं ती वस्तू उचलण्यासाठी ती चटकन खाली वाकली, अन एकदम लाजेनं चूरमार होऊन उभी राहिली. तो तर होता एक कोवळा कच्चा नारळ ! 'असला कसला बेसावधपणा घडला माझ्याकडनं ! कोणी पाहिलं तर नाही मला ? नसावं बहुधा. आंब्याच्या झाडावरून हा कोवळा नारळ कसा काय पडला ?' तिनं भिरीभिरी इकडंतिकडं पाहिलं तसा अचानक तो तिच्या नजरेस पडला. तोच तो पोरगा ! 'आग लागो मेल्याला !'

कशी जिरवली न, अशा आविर्भावात मजीद ओरडला: 'जूगज्जूगू ! जूगज्जूगू !' अन सावकाश पावलं टाकीत त्या झाडाखाली येऊन ठेपला. एखाद्याला भीती दाखविण्यासाठी डोळे वटारावेत तसे त्याने ते खूप वटारले ... काढता येईल तितकी लांब जीभ काढून स्वतःचा चेहरा आक्राळविक्राळ – भीतिदायक करण्याचा प्रयत्न केला. त्याचे ते तसले उग्र रूप पाहून येरव्ही त्या भागातल्या साऱ्या पोरीबाळी 'अग आई गऽ !' असं किंचाळत भिऊन घाबरून पळून जात; परंतु सुहरा त्याला अपवाद होती. त्याच्या त्या बतावणीला ती घाबरली तर नाहीच उलट मान वाकडी करून, जीभ लांब काढून अन डोळे वटारून तीही त्याच्याकडे त्याच थाटात पाहात जागच्या जागी ठाम उभी राहिली !

मजीदचा संताप अनावर झाला. एवढा मोठा एक मुलगा, त्याला भीती दाखवायचा प्रयत्न एक चिमुरडी वेडपट पोरगी करत्येय म्हणजे काय ! तो थोडा

आणखी तिच्या जवळ सरकला. त्याचे डोळे वटारले गेले. भुवया ताणल्या गेल्या. नाकपुड्या फेंदारल्या गेल्या अन 'झुंऽऽ' असा एक भयानक आवाज वातावरण भेदीत राहिला !

सुहरा रेसभर तिथून मागे हटली नाही. भुवया चढवून, डोळे वटारून, नाकपुड्या फेंदारीत तिनंही तस्साच आवाज काढला. 'झुं ऽऽ !'

मजीद स्तब्ध होऊन उभा राहिला. येवढीशी ही अंगठ्यायेवढी चिमुरडी पोरटी ! एका साध्या सुपारीविक्याची मुलगी ! ह्या लाकडाच्या ठेकेदाराच्या मुलाला घाबरत नाही म्हणजे काय ? काय वाटेल ते झालं तरी मुलींनी मुलांना भिऊनच राहायला हवं ना ?

मजीद तिच्या अगदी जवळ जाऊन उभा राहिला. पण ती येवढीसुद्धा मागं हटली नाही. मजीदचा अभिमान डिवचल्यासारखा झाला. त्याला भयंकर राग आला. तो उद्गारला, 'अरे व्वा !' अन त्याने जोरात तिचा हात पकडीत मोठ्या गंभीरपणानं विचारलं, – 'काय नाव आहे ग तुझं ?' नाव जाणून घ्यावं म्हणून नव्हतं विचारलं, – तसं तर तिचं नाव त्याला माहीत होतं – पण काही तरी विचारायला तर हवं होतं ! पुरुष होता ना तो ! म्हणून विचारलं झालं. अन हे सारं त्यानं अशा काही थाटात केलं की वाटावं जणू तो तिचा आत्ता निकाल लावून टाकणार होता. पोरीचे इवले इवलेसे दात आणि दाहीची दहा नखं सळसळू लागली. काय करावं हे क्षणमात्र तिला उमगेनासं झालं. त्याचा हात छाटून तुकडे तुकडे करून टाकावेत की चांगलं बोचकारून रक्तबंबाळ करावं ? 'तुझं नाव काय आहे ग ?' – तिचे अब्बा वा अम्मी कोणीही तिला असं 'अग, तुग' करून कधी हाक मारीत नसत अन हा पोरगा – वाकुल्या दाखविणारा, आंबा न देणारा, कोपर चोख माझं म्हणून म्हणणारा, हा घाणेरडा पोरगा काय म्हणून अशा तऱ्हेनं हाक मारतोय ? अनावर संतापानं ती एकदम पुढं झुकली अन आपल्या डाव्या हाताच्या तीक्ष्ण नखांनी तिनं मजीदचा उजवा हात सारं बळ एकवटून बोचकारून काढला.

जणू काही आगीत तापवलेल्या चिरव्यानं[1] अंग सोलून निघावं तशी मजीदच्या जीवाची त्या तिच्या बोचकारण्यानं कासाविशी झाली. त्यानं तिचा हात सोडला. अन 'अग आई गऽ !' असं तो आर्ततेनं चीत्कारला. तसा घाबरला बिथरला नव्हता तो. त्याच्याही मनात विचार आला, आपणही ह्या पोरीला अस्संच

१. चिरवा —नारळ खोवायची लोखंडी खोवणी.

बोचकरावं. पण नखं होती कुठं त्याला – ती तर त्यानं कधीच दातानं कुरतडून कुरतडून साफ करून टाकली होती – आता काय करायचं ? हां एक तर दातांनी चावावं किंवा ठेवून द्यावेत दोन ठोसे – पण समजा तिनंही उलटून आपल्याला गुद्दे लगावले तर ? काहीही असो, एक तर पोरीनं नखानं ओरबाडलं अन वर पुन्हा गुद्देही लगावले असं लोकांच्या कानी गेलं तर ती किती शरमेची गोष्ट होईल! अखेर त्यानं काहीही केलं नाही. हार मानून, शरमिंधा होऊन चूपचाप गप्प उभा राहिला.

सुहरानं दात विचकून त्याला भेडसावण्याचा प्रयत्न केला. पण मजीदनं हुं का चूं केलं नाही. पुन्हा तिनं तोंड वेंगाडीत मजीदला चिडवलं – म्हणाली, 'अग आई गऽ!' तरीही मजीद स्वस्थ उभा राहिला. त्याचं विचारचक्र चालू होतं. आपली ही फजिती संपादून नेण्यासाठी ताबडतोब काही तरी बोलायला हवं – सुहराचा नक्षा उतरवून तिला खाली मान घालायला लावायला हवं. बोलून चालून मुलगा पडलो ना ? पण काय – बोलणार काय ? काही तरी मर्मी घाव घालील, दुसऱ्याला निरुत्तर करील असं ठणठणित काही तरी बोलायला हवं. काय बोलावं हे कळत होतं पण तसं काही सुचत मात्र नव्हतं त्याला. त्यानं आवतीभवती निरखून पाहिलं. त्याच्या दृष्टीला पडली दाटीवाटीनं वाढलेल्या केळींच्या मध्ये उभी असलेली सुहराची झोपडी – मातीची, गवतानं शाकारलेली – त्याच्या पलीकडे त्याला दिसलं नारळीच्या आगरात उभं असलेलं पांढरा फेक रंग असलेलं स्वतःचं कौलारू घर. त्यासरशी त्याला एकदम एक युक्ती सुचली. ऐकून सुहराला लाजेनं मेल्याहून मेल्यासारखं व्हावं अशा आविर्भावात तो उद्गारला, "माझ्या घराचं छप्पर कौलारू आहे –'

पण याच्यात काय असं मोठं विशेष आहे ? आपलं घर मातीचं आहे, त्याचं छपर गवतानं शाकारलंय ह्यात लाज वाटण्यासारखं असं काय आहे ? सुहरानं तोंड वेंगाडलं अन त्याची नक्कल करीत ती जोरानं उद्गारली – 'अग आई गऽ!'

तसं मजीदनं आणखी एक बाण सोडला – म्हणाला, 'तुझा बाप एक मामुली सुपारीविक्या आहे, माझे वडील मोठे व्यापारी आहेत. लाकडाचे व्यापारी!' ह्या त्याच्या विधानातही सुहराला काही मोठा मानापमानाचा प्रश्न जाणवला नाही. ती सरळ आपली आंब्याच्या शेंड्याकडे पहात स्वस्थ उभी राहिली – जणू मजीद नावाचा कोणी प्राणी तिथं तिच्या जवळ उभा नव्हताच.

मजीद अगदी रंजीस आल्यासारखा, रडकुंडीस आल्यासारखा झाला. नामुष्की ! अवहेलना ! अपमान ! या साऱ्यामुळं त्याचा जीव व्याकुळल्यागत झाला. एखाद्या

गाढवासारखं खुशाल ' ची – भौं ' करीत तारस्वरात गळा काढून रडावं अशी इच्छा त्याच्या अंतर्यामी दाटून आली. रडू येतं तर त्यानं मन थोडं शांत हलकं तरी होतं. पण ... एकाएकी जणू त्याला कसला तरी साक्षात्कार झाल्यासारखं झालं. माझ्यात अशी एक कर्तबगारी आहे की जी इतरांना जमणं कठीणच ! ह्याच्याच जोरावर मी सुहराला हार खायला लावीन. त्यानं आकाशापासून धरतीपर्यंत दृष्टीनं वेध घेत एक गंभीर घोषणा केली. उद्गारला, ' मी आंब्याच्या झाडावर चढू शकतो ! '

सुहराची नजर एकाग्र झाली – आंब्याच्या झाडावर चढता येणं ! वा: याला तर मोठं कौशल्य लागतं माणसाच्या अंगी ! ती काहीशी घाबरली. समजा तो आंब्या-वर चढला तर पिकलेले आंबे तो काय म्हणून मला देईल ? तेव्हा आधीपासूनच आपला हक्क शाबीत करून ठेवावा हे बरं असा तिनं विचार केला. आपल्या हाती सहजासहजी लागणार नाहीत अशा अंतरावर लटकलेल्या दोन मोठाल्या आंब्यांकडे दृष्टिक्षेप करीत ती गंभीरपणे म्हणाली, " ए मुला ! हे बघ, ते दोन मोठे मोठे पिकलेले आंबे दिसताहेत ना ते मी प्रथम पाहिलेत बरं का ! " मजीद ह्या तिच्या विधानावर काहीच बोलला नाही. स्वस्थ उभा राहिला.

हा बोलत का नाही काही ? नक्कीच आंब्यावरच्या मुंगळ्यांना हा घाबरत असणार ! ती म्हणाली – " ते मुंगळे आहेत ना झाडावरचे ते खाऊन टाकतील ते पिकले आंबे – " हे ती ज्या आवाजात म्हणाली, ज्या थाटात ती बोलली ते काही मजीदला रुचलं नाही. त्याला तिचा अस्सा राग आला. म्हणे मुंगळे ! मुंगळेच काय आणखी विंचू का असेनात, काय वाटेल ते झालं तरी मी आंब्यावर चढणारच. हूं! दोन्ही मोठे आंबे तिनं पाहिले आहेत, असो !

मजीद आपले कपडे सांभाळीत झाडावर चढू लागला. त्याच्या सर्वांगाला मुंगळे कडकडून चिकटले. झाडावर चढताना खरचटून त्याची छाती सोलून निघाल्यासारखी झाली. इतकं सारं होऊनही त्यानं सुहरानं पाहिलेले दोन्ही आंबे अखेर अलगद तोडले अन विजयी होत्साता तो झाडावरून खाली उतरला.

सुहरा धावतच त्याच्या जवळ गेली – लोभ ! भीती ! तिनं हात पुढं करीत म्हटलं, " ए मुला, दे ते इकडं." मजीद काहीच बोलला नाही. तोंड लांब करीत, ओठ घट्ट दाबून धरीत तो एखाद्या काष्ठपुतळ्यासारखा जसाच्या तसाच तिथं स्वस्थ उभा राहिला.

" दे ना रे, मुला ! मी पाहिलेले आंबे आहेत ते – "

मजीदनं खट्याळपणं तिच्याकडं एक दृष्टिक्षेप केला. म्हणाला, " तोंडाला पाणी

सुटलेलं दिसतंय एका पोरीच्या ? " अन त्या दोन्ही आंब्यांचा पुन्हा पुन्हा वास घेत तो तिथून निघाला – जाता जाता जणू स्वतःशीच तो पुटपुटत होता ' वाः ! काय चव आहे. काय सुगंध आहे ! ' सुहराला त्याचा संताप आला – क्रोधाग्नीनं जणू सारा देह जळू लागला तिचा. अन अंतःकरण....... ओह ! डोळे आसवांनी डबडबून गेले. ती हमसाहमशी रडू लागली.

मजीद माघारी वळला. आपला प्रामाणिकपणा सिद्ध करण्याची चांगली संधी त्याला मिळाली. त्यानं ते आंबे सुहराच्या पुढं केले – पण आतून इच्छा असूनही सुहरानं काही ते घेण्यासाठी हात पुढं केला नाही. मजीदनं दोन्ही आंबे तिच्या पुढ्यात ठेवले – पण पोरीनं त्यांना बोट लावलं नाही. इतका त्याग ! छेः तिचा विश्वासच बसत नव्हता. आपले दोन्ही हात पाठीशी बांधून अश्रू ढाळीत ती तिथं उभी राहिली.

मजीद काहीशा अभिमानानं म्हणाला, " हवेत तर आणखी तोडून देईन – " सुहराचं काळीज पाझरलं – हवेत तर आणखी तोडून देईन ! त्यागी! शूर धीरवीर! किती चांगला मुलगा आहे. मी ह्याला बोचकारलं, चांगलं का हे ? आता तिच्यातलाही संयम जागृत झाला अन ती स्वतःही त्यागाला प्रवृत्त झाली. म्हणाली, – " मला एक पुरे झाला ! "

त्यावर त्या महात्यागीनंही विरक्त भावानं म्हटलं, " नाही पोरी, ते दोन्हीही घे ! "

" एक बस्स झाला मला ! "

तिनं त्यातला एक आंबा घेऊन मजीदच्या पुढ्यात धरला. मजीदनं तो घ्यायचं नाकारलं तसं सुहरानं त्याला पुन्हा पुन्हा आग्रह करीत म्हटलं, " घेतला नाहीस आंबा तर रडू येईल हं मला – "

मजीदनं आंबा घेतला अन चोखायला सुरुवात केली तसा त्याचा रस त्याच्या छातीवर ओघळत गेला. सुहरानं पाहिलं त्याच्या सर्वांगाला मुंगळे चिकटलेले आहेत. तिला फार वाईट वाटलं ते पाहून – ती त्याच्या शेजारी जाऊन उभी राहिली अन त्याच्या अंगाला चिकटलेला एक एक मुंगळा वेचून काढून फेकून देऊ लागली. तिच्या बोटांच्या नखांचा शरीराला स्पर्श होताच मजीदच्या जीवाचा थरकाप झाला.

त्या दिवशी सुहरानं मजीदला फिरून काही बोचकारलं नाही. पुढं कित्येक दिवसांपर्यंत तिनं त्याला बोचकारलं अन चावलं नाही असं नाही. तिनं फक्त ' मी आता बोचकारीन हं ! ' एवढं म्हणण्याचा काय तो अवकाश की मजीदच्या

अंगाचा भीतीनं नुसता थरकाप व्हायचा. कालांतरानं तिच्याच सम्मतीनं तिची ती अणकुचीदार शस्त्रं मजीदनं कापून टाकली.

## २

एक दिवस सकाळी सुहरा अन मजीद मिळून शेजारपाजारच्या झाडाझुडांची कलमं गोळा करीत होती. कलमांचं ओझं सुहरा वहात होती. मजीद थाटात रोपं दाखवीत पुढं पुढं जात होता. अखेर पुरुषाची जात ना !

मजीदच्या हातात एक उघडचा पात्याचा चाकू होता. ह्यापुढं आपण कशा कशात कर्तबगारी गाजवून दाखविणार आहोत ह्याचं संकीर्तन तो करीत होता. सुहराचं काम होतं तो जे जे काही सांगेल ते ते ऐकून घेणं, त्याच्या बोलण्याला हुं हूं म्हणणं, खूष होणं अन आश्चर्य व्यक्त करणं. मजीदची स्वप्नं दिव्य, भव्य अन अलौकिक असतात, सुवर्ण प्रभेत न्हाऊन निघालेलं एक सुंदर विश्व. ह्या विश्वाचा राजाधिराज आहे मजीद अन पट्टराणी आहे सुहरा. सुहराला कोणीही आडवू शकत नाही. तिला रडू कोसळते. तिची नखं पुढं सरकतील अन मजीदच्या अंगाची लाही लाही होईल. हे सारं घडू नये, ह्यासाठी मजीद प्रत्येक गोष्ट सांभाळून, विचारपूर्वक करीत असतो. पण कधीकधी असं वागायचं बोलायचं त्याला विस्मरण होतं.

मजीद स्वभावानं फार भावनाप्रधान अन वृत्तीनं भलताच स्वप्नाळू आहे. पुढं मोठा झाल्यावर तो खूप मोठ्ठा महाल बांधणार आहे. ह्या महालाच्या भिंती शुद्ध सोन्याच्या असतील. व्हरांड्याला अती मौल्यवान हिऱ्या-मोत्यांची जडणघडण असेल. अन त्याचं छत ? अरे ! काहीच सुचत नाही पहा ! ही सुहरा बोलण्याला हुं हूं म्हणून साथ देत नाही ना, म्हणून तर हा सारा घोटाळा ! हुं हूं म्हणत तिनं त्याचं बोलणं ऐकलं तर मजीदला पुढचं सारं कसं सरळ अन स्पष्ट सुचत जातं.

" सुहरा ! "

" काय मजीद ? "

" तू माझ्या बोलण्याला हुंकार का नाही देत ? "

" देत्ये तर – पण तू मला असं ' अग-तुग ' काय म्हणून करतोस ? " रागानं फणकारत ती त्याच्या दिशेनं पुढं झेपावली. तिच्या नखांच्या प्रसादानं मजीद कळवळून गेला. हातातला चाकू दाखवीत तो तिच्याकडं वळला. तिनं टोकदार नखं असलेले आपले हात त्याच्या पुढ्यात नाचवीत, डोळे विस्फारून आपले भयानक रूप त्याच्या पुढं प्रकट केलं. " मी आणखीन बोचकारीन – हां, सांगून ठेवत्ये... " असं म्हणत तिनं मजीदला घाबरवून सोडलं.

ह्या आधीचं तिचं ते ओचकारणं-बोचकारणं मजीदला सारं आठवलं अन भीतीनं त्याचं रक्त गोठून गेलं. नखं असलेली सुहरा भयानक आहे. ही नखं नसती तिची तर किती चांगलं झालं असतं ! पण आहेत हे तर खरं अन त्यांचा प्रयोग करण्यात तिला एवढंसुद्धा कशाचं काही वाटत नाही, अशा परिस्थितीत तिला उगाच चिडवीत राहाण्यात काय अर्थ आहे ? जणू आपल्या हातून कसला काही अपराध, कसली काही आगळीक घडलीच नाही अशा निष्पाप निरागस भावानं यानं प्रश्न केला, " सुहरानं मला का म्हणून बोचकारलं ? "

" एक मुलगा मला ' अग-तुग ' का म्हणून करतो ? "

मजीद आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला, " मी ? केव्हा ? छे: छे: मुळीच नाही. कदाचित भास झाला असेल सुहराला तसा – "

मजीदच्या मुखावरील निष्पाप भाव अन आताचं त्याचं संयत निरागस बोलणं ह्या साऱ्यांमुळं सुहरा अंतर्यामी अस्वस्थ झाली. ' खरंच का मजीदनं मला एकेरीवर येऊन ' अग-तुग ' असं संबोधलं होतं ? कदाचित मलाच आपलं तसं वाटलं असेल. नाही नाही, म्हटलं नव्हतं तसं काही त्यानं अन असं असताना मी त्याला बोचकारलं हा म्हणजे त्याच्यावर घोर अन्यायच. लाल भडक टरारून सुजलेले ते ओरखड्यांचे चार वळ – ते तर माझ्या कठोर काळजाचे साक्षीदार होत ! ' तिचे डोळे झर्रकन पाणावले.

मजीद पाहिलं न पाहिल्यासारखं करीत शुभ्र रेती पसरलेल्या त्या वाटेनं जाता जाता काहीसं तिला उद्देशून काहीसं स्वत:शीच बोलू लागला. म्हणाला, " माझी कसली काही चूक वा अपराध नसताना अम्मीजान अन अब्बा उगाच आपले मला दम देतात, चोपतात अन कुणी कुणी निष्कारण आपल्या नखांनी मला टोचतात, बोचकारतात. असं करण्यात त्या साऱ्यांना मोठ्ठा आनंद वाटतो. या

जगातून एकदाचा मी नाहीसा झालो की कदाचित ते सारे माझी आठवण काढून म्हणतील – तो बिचारा मजीद आज जिवंत असता तर त्याला कमीत कमी एखाद वेळा बोचकारता तरी आलं असतं ! " हे सारं बोलून होताच मोठ्या चलाखीनं त्यानं चोरून मागं वळून पाहून घेतलं. शाब्बास ! सुहराच्या गालांवरून अश्रूंच्या दोन धारा घळाघळा वहात होत्या ! ते पाहिलं अन तो खूष झाला.

बाल रवी डोंगर माथ्यावर चढून सुहास्य वदनानं पायथ्याशी पसरलेल्या गावावर सोन-प्रकाशाचं सिंचन करीत होता. जणू काही मजीदच्या आनंदात सहभागी होण्यासाठी तो उत्सुक झाला होता. त्या डोंगराच्या पिछाडीस दोन धारांत विभागलेली, डोंगर अन गावाला पालाण घालून पुढं दूर कुठंतरी पुन्हा एका धारेनं वाहणाऱ्या नदीच्या पात्रातून जणू काही वितळविलेल्या सोन्याचा प्रवाहच झगमग झगमग करीत पुढं सरकतोय असा भास होत होता. ह्या स्वर्गीय सौंदर्यानं वेढलेल्या गावाची शांतता भंग पावत होती ती नानाविध प्रभात-पाखरांच्या गोड किलबिलाटानं – अन ते सारं ऐकण्यात मजीद मनोमन अनुभवीत होता कुठल्या तरी अनिर्वचनीय, अबोध अशा आनंदाचा प्रतिध्वनी.

पण सुहराच्या अंतःकरणात मात्र लेशभरही आनंद नव्हता. तिच्या हातून एक अक्षम्य असा अपराध घडला होता – " कसलं काही कारण नसताना उगाच तिनं मजीदला बोचकारलं होतं ! त्याचं स्मरण होता होताच अंतर्यामी दुःख दाटून येऊ लागलं. सुजून आलेल्या चार खुणा आहेत बिचाऱ्या मजीदच्या पाठीवर ! आता ही चूक कशी सुधारायची ! "

मजीद ज्या महालाचं वर्णन तिच्याकडं करीत होता त्याची आठवण करून देत सुहरानं हलकेच म्हटलं – " मुला ! त्या महालाचं पुढं काय ? " जणू मध्यंतरी त्या दोघांत कसलं काही घडलंच नव्हतं. मजीद काहीच बोलला नाही. मग थोड्या वेळानं त्यानं विचारलं, – " सुहरा हुंकार भरत्येस ना माझ्या बोलण्याला ? "

सुहरानं व्यथित स्वरात म्हटलं – ' हां हां ! ' अन आपल्या म्हणण्याच्या पुष्टचर्थ तीन वेळा म्हणाली – ' हूं – हूं – हूं. '

" हां तर मग मी सांगत होतो, " मजीदनं पुढं सांगायला सुरुवात केली · म्हणाला, " तो महाल किनई डोंगराच्या माथ्यावर असणार – "

हां तसं असलं म्हणजे सारं गाव तिथून लख्ख दृष्टीस पडेल अन ज्या दोन नद्यांचे प्रवाह एकमेकांत मिसळून मोठा नद बनून वाहात जातात ते दृश्यही खूप दूर-पर्यंत दिसू शकेल. मजीद, सुहरा अन गावातल्या इतर मुलांनी आजवर कितीतरी

वेळा डोंगरावर थेट वरपर्यंत जाऊन ते दृश्य पाहिलं आहे. मजीदचा संकल्पित महाल खूप भव्य, खूप मोठ्ठा होणार आहे.

" बरं मग पुढं ? " तिनं मोठ्या औत्सुक्यानं, मोठ्या उत्साहानं मजीदला विचारलं, " किती उंच असेल हा महाल ? "

" उत्तुंगतेला का कुठं सीमा असते ?" मजीद उत्तरला, " खूप ! "

' खूप ' म्हणजे किती, याचा सुहराला अंदाज लागेना – तिनं विचारलं – " केळीच्या झाडाइतका का ? "

' केळीच्या झाडाएवढा ! ' मजीदला काही बरोबर वाटलं नाही तिचं विधान. केळीच्या झाडाएवढा उंच महाल. ' छि:! ' असं म्हणत त्यानं सुहराकडं दृष्टिक्षेप केला.

सुहरानं पुन्हा विचारलं, " तर काय मग नारळाच्या झाडाएवढा ?" मजीद तिची कीव करीत तिच्या ह्याही विधानावर तुच्छतेनं हसला.

तेव्हां सुहरानं वर आकाशाला दृष्टी भिडवीत काहीशा शंकित मनानं विचारलं, " अगदी आभाळाइतका का उंच ? "

" हां–" मजीदनं तिचं म्हणणं मान्य करीत म्हटलं, " हो अगदी आभाळाइतका उंच होणार आहे..."

तिनं ते ऐकलं अन तिच्या मनाला एक शंका संत्रस्त करू लागली – " एवढ्या ह्या भव्य अन उत्तुंग महालात एकटाच मुलगा राहाणार की काय ?"

" नाही, " अरबी कथांची आठवण करीत मजीदनं उत्तर दिलं– " मी अन एक शाहजादी-राजकन्या... "

" शाहजादी ? गावात तर कुणी शाहजादी वगैरे नाही ! तरी पण – कोण आहे ही मुलगी ?"

जणू काही एखादं रहस्य, एखादी गुप्त गोष्ट मोठ्या अनिच्छेनं व्यक्त करावी अशा आविर्भावात तो पुटपुटला, " हां अशीच आहे एक कुणी तरी."

ते ऐकताच सुहराचा चेहरा एकदम पडला. तिला खूप राग आला अन दु:खही झालं. तिनं हातातली सारी कलमं खाली फेकून दिली. तिचे डोळे भरून आले. अश्रू ओघळू लागले. ती म्हणाली, " तर मग त्या शाहजादीलाच घ्यायला सांग हे ओझं."

मजीदनं हुकूम सोडला, " ए पोरी, चल उचल ती सारी कलमं !"

सुहरा मोठ्यांदा रडायला लागली. म्हणाली, " मी नाही येणार एका मुलाबरोबर. शाहजादीलाच सांग हे ओझं उचलायला." तिच्या त्या वागण्यानं, तिथंच

तसं हटून राहाण्यानं मजीदच्या हृदयाला पाझर फुटला. तो सरळ तिच्या पुढ्यात जाऊन बसला अन म्हणाला, " सुहरा आहे माझी..."

" हें एं एं एं...रा...रा...ज...क...न्या !" पुनश्च तिच्या मुखमंडलावर प्रसन्नतेची प्रभा फाकली.

" अरे जा रे जा..." ती पुटपुटली.

" अम्मीजानची शप्पथ...!"

सुहरा खुष झाली. मजीद अन सुहरा एकत्र त्या महालात राहू शकतील. किती मजा येईल ! डोळ्यांतून अश्रुधारा वाहताहेत. ओठावर हसू फुललंय अशा अवस्थेत ती जशीच्या तशी तिथं उभी होती. मजीद तिची नखं कापून टाकावीत म्हणून हलकेच पुढं सरकला.

" जाऊ दे रे पोरा !"

पावसाच्या थेंबाआडून ज्याप्रमाणं पूर्ण चंद्र मंदस्मित करताना भासतो त्याप्रमाण रडता रडता मध्येच सुहरा खुदकन हसली.

" तर, माझी नखं नाही कापायची हं..." सुहरानं ओठांचा चंबू करीत म्हटलं– "एक मुलगा पुन्हा असं काही वायफळ बोलला तर त्याला बोचकरायचं आहे मला."

" सुहरा मला बोचकारील ?"

" हो, बोचकारीन ! नेहमी-नेहमी बोचकारीन–" दात खात; भुवया उंचावीत तिनं बोचकारण्याचा पवित्रा घेतला.

मजीद थरथर कापत तिथून उठला; अन जणू कुठल्या घोर चुकीची आठवण काढावी, अशा आविर्भावात त्यानं म्हटलं, " शाहजादी बोचकारू शकत नाही !"

" अस्सं ! म्हणजे शाहजादीनं बोचकारलं तर ते मोठं पाप होईल ?" काहीशा शंकित मनानं सुहरानं विचारलं.

" अम्मीची शप्पथ," शपथ खात मजीद म्हणाला, " अम्मीची शप्पथ, बोचकारणं निषिद्ध आहे."

सुहरा घाबरली. जर शाहजादीच्या बाबतीत बोचकारणं ही बाब निषिद्ध असेल तर मग ह्या नखांची आता गरजच काय ? जणू काही आपण फार मोठा त्याग करीत आहोत अशा थाटात तिनं आपले दोन्ही हात त्याच्या पुढ्यात धरले अन सम्मतीच्या स्वरात म्हणाली, " तर मग काढून टाक ही नखं."

मजीदनं खुषीत सुहराच्या पुढ्यात बैठक मारली.

बाणांप्रमाणे लांब अन अणकुचीदार अशी तिची दाहीच्या दाही नखं मजीदनं कापून फेकून दिली. मग तो उठून उभा राहिला. दोघांनी जाऊन आपली बाग लावली. आपल्या घराच्या ऐसपैस अंगणाच्या तिन्ही बाजूंना मजीदनं छोटे छोटे खड्डे खणले. त्यांत सुहरानं एक एक कलम लावलं अन त्याला व्यवस्थित पाणीही घातलं. तऱ्हेतऱ्हेच्या झाडांच्या कलमांनी वाफे भरून गेले. कोपऱ्यात लावलं होतं एक जास्वंदीचं कलम. त्याला एक सुकलेलं लालचुटुक फूलही होतं.

रोज सकाळी सुहरा मजीदच्या घरी जाऊन बागेतल्या कलमांना पाणी घालायची. एकदा सुहराच्या आईनं हसत हसत तिला विचारलं, "काय सुहरा, लोकांच्या झाडांना पाणी घालतेस ?"

"लोकांची कुठची ?" सुहरानं उत्तर दिलं.

त्या दिवशी सायंकाळी सुहरा अन मजीद अंगणात उभे होते. पालवी फुटलेल्या त्या कलमांकडे अंगुलीनिर्देश करीत मजीदनं जरा जोरातच विचारलं, "ही सारी सुहराची आहेत ?"

"नाही तर काय मग ती एका मुलाची आहेत हो ?"

मजीद मिस्किल हसला. म्हणाला, "पोर काही कमी लोभी नाही..."

ह्या बोलण्यावर सुहराला राग न येता तरच नवल होतं. तिनं आपल्या नखांनी मजीदला बोचकारायची खूप धडपड केली. पण नखंच कुठं होती, म्हणून मजीद म्हणाला,– "हां आणखी खाजव, खूप मजा वाटतेय बघ...."

सुहरानं आपली व्यवस्थित कापलेली नखं पाहिली अन तिला रडूच कोसळलं– संतापातिरेकानं ती चीत्कारली, "तर मग मी दातांनी चावीन," अन असं म्हणत तिनं मजीदचा हात पकडून चावायला सुरुवात केली. ह्यातून सुटायचा काही मार्ग दिसेना तशी मजीदनं पवित्र कुराणाची शपथ खात म्हटलं, "शप्पथ, शाहजादीनं कधी कुणाला चावता कामा नये ! मनाई आहे."

अश्रू ढाळीत सुहरानं विचारलं, "कुणाला ?"

मजीदनं हसत उत्तर दिलं, "हो, कुण्णालाही नाही–."

# ३

सुहरा हिशोबात हुशार होती. मास्तर तिचं कौतुक करायचे अन मजीदला चोपायचे. हिशोबाच्या बाबतीत मजीदचा नेहमी गडबडघोटाळा व्हायचा. त्यानं कितीही प्रयत्न केला, कितीही अभ्यास केला तरी त्याचे हिशोब कधी बरोबर यायचे नाहीत. हटकून उत्तरं चुकायची.

मास्तर मजीदला हाक मारायचे ते– ' मूर्खराज ' अशीच. हजेरी घेतानादेखील हेच नाव ! ह्या बाबतीत कुणाची काही तक्रार नव्हती. मजीद होताच मूर्ख– म्हणून वर्गात इतर मुलांत बसलेला मजीद जोरानं उत्तर द्यायचा–" हजर– '

" एकात एक मिळवले म्हणजे किती होतात रे ?" एक दिवस गुरुजींनी शिष्य-वरास प्रश्न केला. सारे जग जाणते की एकात एक मिळविला की दोन होतात– पण मजीदनं त्याचं जे अजब उत्तर दिलं ते ऐकून गुरुजी खोखो हसले. थट्टेतलं नाव म्हणून ते उत्तर पुढं त्याच्यामागं कायमचं चिकटलं. उत्तर द्यायच्या आधी मजीदनं मनाशी खूप विचार केला होता. त्याला वाटलं दोन छोटचा छोटचा नद्या एकमेकींत मिसळून जर एक मोठ्ठी नदी होते तर दोन ' एक ' मिळविल्यानं नक्कीच एक ' मोठ्ठा एक ' होत असणार, ह्याप्रमाणं मनाशी हिशोब पक्का करीत त्यानं ऐटीत उत्तर दिलं– "जरा मोठ्ठा एक !" गणितशास्त्रात अशा स्वरूपाचा एक अभिनव शोध लावल्याबद्दल गुरुजींनी त्या दिवशी त्याला बाकावर उभं केलं.

' जरा मोठ्ठा एक !' सारी जणं त्याच्याकडं पहात हसायला लागली. तरीही एक अन एक दोन होतात ही गोष्ट मजीदच्या मनाला पटली नाही...मान्य झाली नाही; तेव्हा त्याला सहा गरमागरम छड्या लगावून, " फक्त जरा एक मोठ्ठी छडी खाल्लीस असं समज झालं. " असा गुरुजींनी त्याला पोक्त सल्ला दिला.

त्या दिवसापासून त्याचे वर्गमित्र तो दृष्टीस पडताच ' जरा मोठ्ठा एक ' असा त्याचा निर्देश करू लागले.

एकंदर ह्या साऱ्या प्रकारामुळे मजीद मनस्वी दुःखी झाला. आपण जे उत्तर दिलं ते बरोबरच आहे. मग का कुणी त्यावर विश्वास ठेवीत नाही. ते खरं मानीत नाही ? कदाचित ते चूकही असेल ! कदाचित आपण मूर्ख असू... दुःख असह्य झालं तसं तक्रारीच्या स्वरात त्यानं आपली व्यथा आईला सांगितली. आईनं सल्ला दिला की " दुःख अल्लाला सांग, गाऱ्हाणं अल्लाला घाल – बेटा, अल्ला साऱ्यांचं गाऱ्हाणं ऐकतो !"

आईनं केलेला उपदेश ग्राह्य मानून त्या कोवळ्या पोरानं जगच्चालक विश्वनियंत्याच्या चरणी भावपूर्ण प्रार्थना केली की – " हे तारणहार, हे प्रभू ! माझे सारे हिशोब बरोबर येऊ देत. " आयुष्यातली ही त्याची पहिली प्रार्थना. रात्रंदिवस तो प्रार्थना करीत होता अन तरीही त्याची उत्तरं चुकतच होती. त्याला खूप छड्या खाव्या लागत होत्या. तळहात सदा ठणकत असायचे. हे सारं जेव्हा अगदी असह्य झालं तेव्हा त्यानं सारं काही सुहराला मोकळेपणानं सांगून टाकलं...अन तेही बऱ्याचशा झगड्यानंतरच. ' जरा मोठ्ठा एक ' अशी स्वःतची टवाळी व्हायला लागल्यापासून त्यानं वर्गात सर्वांशीच बोलणं टाकलं. जवळच्याच बाकावर बसलेली सुहरा दिसायची, पण तो तोंड फिरवायचा, तिची नजर टाळायचा, तिच्याकड पाहणं टाळायचा. अखेर एक दिवस तो बोलला. सुहरा हसली, मग तिनं आपली नेहमीची बसायची जागाच बदलली अन ती मजीदच्या अगदी शेजारच्याच बाकावर कोपऱ्यात बसायला लागली. तेव्हापासून मजीदचं मार खाणं बंद झालं. त्याची सारी उत्तरं अगदी व्यवस्थित बरोबर यायला लागली.

" अरे व्वा ! " गुरुजी आश्चर्य व्यक्त करीत म्हणाले, " वाटलं होतं तसे तुझ्या डोक्यात अगदीच काही दगड भरलेले दिसत नाहीत ! " गुरुजींच्या ह्या कौतुकानं त्याचं ' जरा मोठ्ठा एक ' टवाळीचं नाव पुसून टाकलं. वर्गातली सारी मुलं आता अहमहमिकेनं म्हणू लागली की–" मजीदच साऱ्या वर्गात हुशार आहे. "

हे ऐकलं की सुहरा फक्त गालातल्या गालात हसायची. पण त्याचा अर्थ कुणाच्याही ध्यानी आला नाही. मजीदची उत्तरं बरोबर येण्याचं सारं रहस्यच तिच्या ह्या हसण्यामागं दडलेलं होतं. तोंडच्या हिशोबाच्या वेळी जेव्हा सारी मुलं उठून एकमेकांच्या तोंडांकडे पहात उभी राहात तेव्हा मजीदचा डावा डोळा सुहराच्या पाटीवर केन्द्रित झालेला असायचा. तो सारा प्रश्न आपल्या पाटीवर उतरून घ्यायचा. उदारण पुरं सोडवून झालं तरी सुहरा खाली बसायची नाही. प्रथम खाली बसायचा तो मजीद. शाळा सुटल्यावर जेव्हा ते घरी यायला बरोबर निघत तेव्हा दुसरं कोणी ऐकणार नाही अशा बेतानं सुहरा त्याला चिडवायची. काही गोष्टी आठवून हसत ती त्याला म्हणायची–' जरा मोठ्ठा एक !' आपला सारा राग एका शब्दात व्यक्त करीत मजीद म्हणायचा–' शाहजादी !' ते ऐकून, चांदीच्या घंटेसारख्या किणकिणत्या शोक-मधुर स्वरात फिकटसे हसत सुहरा आपल्या हाताची बोटं निरखून पहायला लागायची. सारी नखं कशी साफ कापून टाकलेली ! स्वच्छता अन चांगली वर्तणूक ह्या बाबतीत शाळेत ती सर्व विद्यार्थ्यांत आदर्श मानली गेली होती.

मजीदच्या कपड्यांवर शाईचे अन फळाबिळांच्या रसाचे डागदेखील पडलेले असायचे.

मजीद आसपासच्या आंब्याच्या झाडांवर चढायचा अन अगदी शेंड्यावरच्या डहाळीला लगटून वरच्या पर्णसंभारातून दूर पलीकडे दिसणाऱ्या विश्वाचं दर्शन घेण्यात त्याला खूप मजा वाटायची. चक्रवालसीमेपलीकडे वसलेल्या विश्वाचं दर्शन घ्यायचीही त्याच्या अंतर्यामी तीव्रतम इच्छा होती. अशा विचारात गर्क होऊन जेव्हा तो झाडाच्या अगदी शेंड्यावरच्या फांदीवर उभा असायचा तेव्हा खाली उभी असलेली सुहरा त्याला विचारायची, "मुला, मक्का का पाहतोयस तिथून?"

मजीद उत्तरादाखल भव्य मेघमंडलाला स्पर्शून उड्डाण करणाऱ्या गरुडपक्ष्याचं गाणं गाणाऱ्या- "मक्काही पाहिली ... मदिनेची मशीदही पाहिली ..." ह्या काव्यपंक्ती मधुर आवाजात गायला लागायचा.

## ४

सुहराच्या कान टोचण्याच्या समारंभाला मजीद गेला पण फार यातना सहन करीत अन गुपचूप.

मजीद सुन्ता झाल्यापासून अंथरुणातच पडून होता. शाळांना सुट्ट्या होत्या. त्याचा सुन्तासमारंभ साऱ्या गावात दणक्यात गाजला. गॅसच्या बत्त्यांच्या झगमगाटात बॅण्डच्या साथीनं हत्तीवरून त्याची गावभर मिरवणूक काढली होती. नंतर एक मोठी मेजवानी झाली. हजारो लोक मेजवानीसाठी निमंत्रित केले गेले होते. जेवणाच्या आधीच सुन्नत-संस्कार[1] उरकून घेण्यात आला होता.

दिवसभर मजीद भलताच घाबरलेला होता, 'आपलं काही तरी कापून टाकण्यात येईल. पण काय? त्यामुळं माणूस मरतं?' भयानं त्याचा थरकाप होत होता. त्याच्या मनानं घेतलं की आता काही आपण रात्रीपर्यंत जिवंत राहात नाही. काय

१. सुन्नत संस्कार - सुन्ताविधी.

होणार आहे ह्याची त्याला कसलीच काही कल्पना नव्हती. मुसलमानात साऱ्याच पुरुषांची सुन्नत (सुन्ता) होत आली आहे. ज्याची सुन्ता झाली नाही असा शोधून कोणी सापडणार नाही. तरीही त्यानं सुहराला विचारलं, " ही सुन्ता कशी काय केली जाते ? "

सुहराला त्यातली काहीच माहिती नव्हती. ती एवढा मात्र धीर – दिलासा देऊ शकत होती की काय वाटेल ते होवो. यात तो मरणार नक्की नाही. तरीही मजीद मनोमन खूपच घाबरत होता.

' अल्ला हु अकबर ' – ही गंभीर गर्जना मंडपात झाली. त्यानंतर मजीदच्या अब्बांनी त्याचा हात धरून त्याला एका छोटयाशा खोलीत आणून सोडलं. तिथं एक उखळी पालथी करून तिच्यावर पांढरं शुभ्र वस्त्र आच्छादलं होतं. त्याच्यासमोर एक उंच शमादान मांडलं होतं. त्यात बारा ज्योती जळत होत्या. त्या खोलीत उस्मान न्हाव्याव्यतिरिक्त आणखी दहा बारा लोक होते. त्यांनी मजीदचा अंगरखा काढला, बाकी सारे कपडे उतरवले...तशा त्या दिगंबर अवस्थेतच त्याला उचलून त्या उखळीवर बसवण्यात आलं. मोठया आश्चर्याची गोष्ट आहे. आता हे लोक करणार आहेत तरी काय !

मजीदचे डोळे बांधण्यात आले. डोकं, हात अन पाय त्या लोकांनी दाबून धरले. रेसभर त्याला इकडचं तिकडं हालता येत नव्हतं. चारही दिशांनी घुमणाऱ्या ' अल्ला हु अकबर 'च्या घोषणेव्यतिरिक्त कानाला दुसरं काही ऐकू येत नव्हतं. ह्या सर्व गदारोळात त्याच्या दोन्ही जांघांमध्ये एकदम थोडसं काहीतरी दुखावल्यासारखं जाणवलं–फार तर एक क्षणभर. त्यानंतर लगेच पाण्याचा शिपका, एक दाह, आगीत होरपळून निघाल्यागत तगमग...कासाविशी...तडफड !

मजीदला बिछान्यावर नीट झोपवण्यात आलं. डोक्याखाली, पायांखाली उश्या सरकवण्यात आल्या. ह्या साऱ्या गडबडगोंधळातही त्यानं काय घडलंय याचा अंदाज घेण्याचा प्रयत्न केला. त्यानं पाहिलं त्याची ती जागा लाल शाईत बोट बुडवावं तशी काही दिसत नव्हती. दिसत असं होतं की जणू बोट शाईत बुडलेलं नाही; पण बाटलीच्या तोंडाशी असलेली शाई बोटाच्या कडेला चारी बाजूंनी लागली आहे. पण तिथं जे दिसत होतं ती काही शाई नव्हती, तर तिथून निघालेलं रक्त होतं. दुसऱ्या दिवशी येवढी ही गोष्ट त्यानं सुहराला सांगितली.

खिडकीबाहेर उभं राहून सुहरानं विचारलं, " मजीद, भीती वाटली तुला ? घाबरला होतास तू ? "

" भीती अन् मला ? " त्या तशा अवस्थेत पडल्या पडल्या त्यानं फुशारकी मारली, " छे: मला भीतीबीती काही एक वाटली नाही. '

त्याच वेळी सुहरानं आपल्या कान टोचण्याच्या समारंभाची बातमी त्याला सांगितली. दहाबारा दिवसांनीच तिचा कान टोचण्याचा समारंभ व्हायचा होता.

" मजीद काही येऊ शकणार नाही. नाही ? "

" मी येईन. " मजीद म्हणाला.

पण प्रत्यक्ष तो दिवस येऊन ठेपला, तेव्हा परिस्थिती अशी होती की मजीदला ह्या कुशीचं त्या कुशीला होता येत नव्हत, प्रथम सुहराची आई अन नंतर खुद्द सुहरा घरातल्या लोकांना आमंत्रण करायला आली होती, असं मजीदनं ऐकलं. थोडया वेळानं त्यानं सुहराला खिडकीबाहेर उभी असलेली पाहिलं. उत्कंठेनं तिचा चेहरा ओढल्यागत झाला होता. परंतु डोळयात एक आगळीच चमक होती. " आज माझे कान टोचणार ! "

मजीद गुपचूप गालातल्या गालात हसला. त्या हास्याची प्रभा सुहराच्या मुखमंडलावरही फाकली गेली. मजीदनं तिच्या सुंदर कानांच्या पाळी अन कडाकड दृष्टिक्षेप केला. त्याला मोठं नवल वाटलं–" ह्यात छोटी छोटी छिद्रं पाडली तर दुखणार तर नाही ? "

सुहरा म्हणाली, " समजणं फार दूर नाही–ये अन स्वतःच डोळयांनी पहा आपल्या. '

मजीदला जायची इच्छा झाली, पण बिछान्यावरून उठायची ताकद नव्हती त्याच्या अंगात. तरीही थोडया वेळानं, कुणी पहात नाही अशी संधी साधून, तो उठून उभा राहिला. सारं शरीर असं जड जड झालं होतं की जणू देहावर कुणी प्रचंड शिळा आणून ठेवलीय. सहस्रावधी जखमांचे घाव देहावर व्हावेत अशा दुःखद यातना होत होत्या. काळजात कळ उठत होती. पाय दूर दूर फैलावीत, जपून लांब लांब टांगा टाकीत तो चपळाईनं घराबाहेर पडला. गल्लीतून लपत छपत मागच्या दरवाजानं तो सुहराच्या घरी पोहोचला. तिथं कसली गर्दी वा गडबड काही दिसत नव्हतं. त्यानं मनाशी विचार केला, गरिबी आहे यांची म्हणून असेल हे असं. श्रीमंत असते तर वाजंत्री, शोभेच्या दारूची आतिशबाजी, मेजवानी... सारं काही झालं असतं.

मजीदकडं लक्ष जाताच सुहराची आई मोठमोठयानं हाका मारीत धावतच त्याच्या जवळ गेली अन म्हणाली,

" माझ्या राजा, का आलात तुम्ही इकडं ? "

मजीद मोठ्या प्रयासानं उद्गारला, " कान टोचण्याचा विधी पहायला मिळावा म्हणून. "

तोपर्यंत सुहराही तिथं येऊन पोहोचली. तिचा सारा चेहरा लालीलाल होऊन गेला होता, डोळ्यात पाणी दाटून आलं होतं. दोन्ही कानांत वरपासून खालपर्यंत छिद्रं पाडून त्यात काळे धागे गाठी देऊन ओवले होते. उजव्या कानाला अकरा छिद्रं टोचली होती अन डाव्या कानाला दहा. एक-एक करीत सारी छिद्रं सुकतील अन मग त्यांतले काळे धागे काढून त्यांच्या जागी हलक्या फुलक्या चांदीच्या बाळ्या अडकवल्या जातील. पुढं लग्न झालं की चांदीच्या बाळ्या काढून टाकून त्यांऐवजी सोन्याच्या बाळ्या घातल्या जातील. मजीदला हे सारं काही माहीत होतं.

मजीदनं सुहराला विचारलं, " फार दुखलं ? "

सुहरानं दुःखमिश्रित हास्य करीत म्हटलं, " थोडं थोडं. "

तेवढ्यात मजीदला शोधीत त्याचे घरचे लोक तिथं आले, त्यांनी त्याला अल्लाद उचलून घरी नेलं अन बिछान्यावर नीट झोपवलं.

ह्या घटनेमुळं मोठा गोंधळ झाला. मजीदला त्याच्या वडिलांनी दम भरला. मजीदच्या आईलाही ते त्यावरून ताडताड बोलले. सुहराच्या आईवडिलांनाही त्यांनी नाही नाही त्या शिव्या घातल्या अन मग तो सारा तमाशा संपुष्टात आला.

सुहराच्या आधी मजीद बरा झाला. त्या दिवशी त्याला आंघोळ-बिघोळ घातली गेली. नवे कपडे चढविले गेले, अंगाला अत्तर लावलं गेलं अन अशा प्रकारे व्यवस्थित साजशृंगार करून मोठ्या गाजावाजानं त्याला मशिदीत नेण्यात आलं.

सुहरानं हा सारा डामडौल, हा गाजावाजा पाहिला अन तिनं मजीदला चिडवण्यासाठी म्हटलं, " वा: काय पण एका मुलाचा रुबाब ! जसा काय लग्नाच्या वरातीसाठीच सजून चाललाय. "

# ५

त्या वर्षी सुहरा अन मजीद दोघेही गावाच्या शाळेतल्या शेवटच्या वर्गाची परीक्षा उत्तीर्ण झाले. सुहराची इच्छा शहरातल्या शाळेत नाव घालून आणखी पुढं शिकावं अशी होती – पण तिच्या ह्या इच्छेचा चक्काचूर व्हावा अशी एक दुर्दैवी घटना घडली – सुहराचं पितृछत्र हरपलं. मजीदनं आयुष्यातलं पहिलं मरण डोळ्यांनी पाहिलं.

ह्या दुर्दैवी घटनेमुळं सुहरा, तिच्या दोन बहिणी अन आई अनाथ झाल्या.

सारी मिळून त्यांची संपत्ती होती – एक छोटंसं घर अन त्याला लागून असलेली थोडीबहुत जमीन. तिचे वडील सुपारीचा व्यापार करायचे आणि त्यातून जी मिळकत होई त्याच्या आधारे कुटुंबाचे पालन-पोषण करायचे. सफेद टोपी, लाल मातीचा रंग त्यालेलं धोतर अन अंगावर उपरणं हाच काय तो त्यांचा नेहमीचा पोषाख असायचा. काळ्या दाढीनं वेष्टिलेल्या त्यांच्या गोल गोऱ्या चेहऱ्यातले काळेभोर डोळे सदैव हास्यानं ओसंडून वहात असायचे. बगलेत पोतं दाबून धरून जरा पुढं झुकत चालण्याची त्यांची सवय होती. घरोघरची सुपारी विकत घेऊन, ती पोत्यात भरून अन पोतं स्वतःच्या डोक्यावर वाहून ते शहरात जायचे अन तिथं ती ते विकायचे. त्यांना बोलायला खूप लागायचं. ते जिथं जिथं जायचे अन तिथं जे जे पहायचे ते सारं घरी परतल्यावर मजीदला सांगायचे. ते म्हणायचे, "खरे मुसलमान तर बाहेरच आहेत. आपल्या गावातले जे आहेत ते सारे अंधविश्वास बाळगणारे आहेत; पाषाणहृदयी आहेत. चांगली माणसं पहायची असतील तर गाव सोडून बाहेरचं जगच पहायला हवं. इथल्या लोकांना वाटतं की आम्हीच काय ते सच्चे मुसलमान आहोत. कसलं ज्ञान नाही, अडाणी आहेत हा त्यांचा खरा दोष आहे. अल्लाच्या कृपेनं तुम्ही सारे शिकून सवरून मोठे झालात की ही परिस्थिती बदलेल."

सुहरानं मोठमोठ्या परीक्षा उत्तीर्ण व्हावं अशी त्यांची फार मोठी इच्छा होती. "अन...," ते म्हणायचे, "तिला चांगलीशी मोठी नोकरी मिळाली की ती आम्हा सर्वांना विसरून जाईल– 'हे माझे अब्बा आहेत– वडील आहेत–' असं सांगायला तिला लाज वाटेल··· "

"खरं आहे," मजीदं टीका करीत त्यांच्या विधानाच्या पुष्टयर्थ म्हणायचा,–" सुहरा मोठी शिष्ट अन मिजासखोर आहे."

अशा वेळी दरवाजाआड गुपचूप उभी असलेली सुहरा डोळे वटारून, दात-ओठ खात, उग्र रूप दाखवीत फक्त त्यालाच ऐकू जाईल अशा थाटात ओठातल्या ओठात पुटपुटायची– " जरा मोठ्ठा एक ! "

अशा प्रसंगी मजीद तिला एक विशिष्ट प्रकारची शिक्षा करायचा. त्याच्या जवळ नेहमी एक गलोल असायची– तिनं एक छोटासा खडा बरोबर नेम धरून तो सुहराच्या पायावर मारायचा. त्याचा नेम कधी चुकत नसे– खडा तिच्या पायाला टचकन लागला की म्हणायचा– " त्या दरवाजावरच्या चुन्याच्या डागावर धरला होता सहज मी नेम. "

सुहरा आपल्या जागेवरनं रेसभर इकडं तिकडं हलायची नाही. तिच्या डोळ्यातनं एखाद दुसरा अश्रुबिंदू गालावर घरंगळे. तिच्या आईच्याही लक्षात ह्यातलं काही यायचं नाही. ती मजीदला म्हणे– " तू नेम धरधरून आमची गाडगीमडकी सारी फोडून टाकशील, मजीद ! तुम्हा लोकांसारखी श्रीमंती वाया नाही चालली आमची ! "

" अस्सं ! आता ह्यापुढं नेमबीम मारायला नाही येणार तुमच्याकडं– मी हे गाव सोडून जाणार आहे आता. "

" कुठं जाणार आहेस ? "

" सहा महिन्यांहूनही अधिक अंतरावरच्या जागी ! "

" मग, " सुहरा म्हणे– " रात्री घरी परतणार··· "

मजीदविषयी सुहराची ही भावना आहे– पण सुहराच्या बाबतीत मजीद असला-कसला काही विचार करीत नाही. तो म्हणायचा–

" मग ? मग मी सारं जग भटकून येईन. तेव्हा सुहरा कुठल्यातरी मोठ्या हुद्यावर असेल. तेव्हा ह्या बाईसाहेब मला पाहून साधी ओळखदेखील चेहऱ्यावर दाखवणार नाहीत. "

सुहराच्या ओठावर एक मंद स्मित विलसून जायचं– जणू अदृष्टातल्या त्या सुखी संतुष्ट आणि समाधानी जीवनाचं दर्शनच तिच्या डोळ्यांना घडलंय. खूप विचार करून ती म्हणायची– " एक मुलगाच तर खूप शिकून मोठ्ठं होण्यासाठी, चांगल्या पगाराची मोठी नोकरी मिळवण्यासाठी जायला निघालाय हे सारं करायसाठी आमच्याजवळ पैसे नाहीत ना··· ".

पण ह्यातलं काही एक घडलं नाही. सुहराचे अब्बा पावसात भिजून घरी आले. दोनतीन दिवस तापानं फणफणले. तिसऱ्या दिवशी सायंकाळी त्यांचं प्राण-पाखरू

उडून गेलं. त्यांच्या मृत्यु-शय्येजवळ मजीदही होता. विझलेल्या ज्योतीतून निघालेल्या धुरानं काळवंडलेल्या काचेसारखे दिसणारे ते दोन डोळे··· प्रकाश अन चैतन्याला पारखं झालेलं ते जड शरीर !

दुसऱ्या दिवशी अंत्यविधी झाला. त्या दिवशी संध्याकाळी रोजच्याप्रमाणं मजीद आंब्याच्या झाडाखाली सुहराची वाट पाहात उभा होता. शोकभारानं खचलेली सुहरा तो उभा होता तिथं आली. मजीदनं तिच्या तोंडाकडं पाहिलं मात्र, तिला एकदम रडू कोसळलं– काय बोलावं हे मजीदला उमगेना··· त्याच्याही तोंडातून शब्द फुटत नव्हता. त्याचे अश्रू सुहराच्या मस्तकावर अन सुहराचे त्याच्या वक्षभागावर टपटपा गळत होते.

त्या वेळी अंधारानं ग्रासलेल्या नारळाच्या दोन झाडांवर चंद्रकोर चमकत होती.

## ६

सुहरानं आपल्या घराच्या उंबरठ्यावरून उभ्या उभ्या बघितलं की मजीदचे अब्बा त्याला शहरातल्या शाळेत दाखल करण्यासाठी घेऊन चालले आहेत. दोघांच्याही हातात छत्र्या होत्या. मजीदची छत्री नवी होती. त्याचं खमीस, लुंगी, टोपी–सारं नवीन होतं. ते दूर गावच्या सडकेवर पोहोचून पार दृष्टीआड होई तो ती त्यांच्याकडं तशीच एकटक नजरेनं पाहात राहिली.

त्या दिवशी संध्याकाळी शाळेतून परतल्यावर मजीद रोजच्यासारखा आंब्याच्या झाडाखाली येऊन उभा राहिला. त्याच्या हातात नवं पुस्तक होतं. मोठ्या उत्सुकतेनं अन अभिमानानं आपलं पुस्तक त्यानं सुहराला दाखवलं. तो म्हणाला "खूप चित्रं आहेत याच्यात."

सुहरानं पुस्तक घेतलं अन पानं आलटून-पालटून पहायला सुरुवात केली. दोन मैलांवर असलेल्या त्या शहराच्या अद्भुत दृश्यांचं वर्णन मजीदनं केलं. मग त्यानं आपल्या शाळेविषयी सांगायला सुरुवात केली. म्हणाला, "शहराच्या अगदी मध्यावर

सात मोठमोठाल्या इमारती आहेत. साऱ्या पांढऱ्या धोप रंगवलेल्या अन छत असलेल्या इमारती आहेत त्या. इथल्या शाळेसारखी नाहीये काही ती शाळा. खूप मोठा बगीचा··· त्यात किती किती प्रकारची झाडं आहेत माहीत आहे ? मी त्या साऱ्यांचे बी आणीन. हां, शिवाय खेळायचं मैदान– पाहण्यासारखं आहे सारं काही! ··· मुलं-मुली किती आहेत, त्याला तर गणतीच नाही. हेडमास्तर सोनेरी फ्रेमचा चश्मा लावणारे एक ढब्बूसे गृहस्थ आहेत. हातात सदैव छडी असते त्यांच्या. अन माझे मास्तर आहेत ना– त्यांना एकच डोळा आहे. आमच्या वर्गात बेचाळीस मुलं–मुली आहेत. त्यात मुली चौदा आहेत ! ··· "

मजीद थबकला. पुस्तकावर सुहराचे अश्रू टपकत होते.

" सुहरा ! " मजीदनं हाक मारली. सुहराच्या रडण्याचं कारण मजीदच्या ध्यानी येईना– त्यानं पुन:पुन्हा विचारलं,– " का ग रडत्येस ? "

अखेर सुहरानं तोंड वर करीत हलकेच म्हटलं, " मलाही शिकायची इच्छा आहे ! "

सुहराला शिकायची इच्छा आहे ? याला काय मार्ग आहे ? कसा सोडवता येईल हा प्रश्न ? मजीदनं खूप विचार केला.

अखेर त्यानं उपाय शोधून काढला. म्हणाला, " मी जे जे शिकेन ते ते रोज सुहराला सांगत जाईन. "

आपआपसांत ही गोष्ट नक्की करून आल्यावर त्यानं ह्याहीपेक्षा अधिक चांगला मार्ग शोधून काढला. आपल्या घरात पैशाला ददात नाही. सुहरालाही शिक्षणासाठी शहरच्या शाळेत पाठवायची व्यवस्था करायला काय हरकत आहे ? वडिलांना सांगायला भीती वाटते, तर आईला सांगता येईल असं त्यानं मनाशी ठरवलं.

त्या दिवशी रात्री जेवण आटोपल्यावर त्याचे अब्बा पानाला चुना लावीत बसले होते. अम्मी त्यांना सुपारी कातरून देत होती. धडधडत्या अंत:करणानं मजीद आपल्या आईजवळ जाऊन बसला अन हलकेच म्हणाला, " अम्मीजान ! "

आईनं प्रेमपूर्ण स्वरात त्याला विचारलं– " काय आहे, बाळ ? "

मजीद दबलेल्या आवाजात म्हणाला, " आपण त्या सुहराचीही शिकायची व्यवस्था केली तर कसं काय होईल ? "

थोडा वेळ कुणीच काही बोललं नाही. अब्बांनी पान तोंडात ढकललं. कातरलेली सुपारी तोंडात टाकून चर्वण सुरू केलं. मग सोन्यासारख्या झगमगणाऱ्या पितळेच्या पानदानातून एक चांदीची डबी काढून उघडली. एक रूक्ष सुगंध वातावरणात

दरवळून उठला. डबीतून मसालामिश्रित तंबाखू तळहातावर काढून घेऊन फक्की मारली. ते सारं तोंडातल्या तोंडात एका बाजूला दाबून धरीत अंगणात दूरवर एक पिचकारी मारली.

" ह्याच्यात थुंकणं पुरेसं नाही का ? " असं म्हणत अम्मीनं त्यांच्या पुढ्यात थुकदाणी सरकवली. म्हणाली, " त्या झाडांच्या पानांवर कसा रक्त सांडल्यासारखा शिडकाव झालाय ह्या तुमच्या थुंकण्याचा– ?"

" बरं मग बिघडलं कुठं ! " –असं तुच्छतेनं म्हणत अब्बा आरामखुर्चीत पहुडले. दिवसापेक्षाही जास्त उजेड देणाऱ्या बत्तीच्या प्रखर प्रकाशात त्यांच्या रेशमी कुडत्याची सोन्याची बटनं चमचम चमकत होती. त्यांच्या काळ्या भुवया उंचावल्या गेल्या. पिंगट रंगाच्या कातड्याप्रमाणं तकाकणाऱ्या कपाळाला आठ्या पडल्या. सोन्याच्या चश्म्याच्या गोल भिंगांतून त्यांनी रोखून पाहिलं अन मग मजीदच्या बाबतीतलं आपलं मत व्यक्त केलं–

" अग ! जाऊ दे याला कुठंही. जरा बाहेरचं जग पाहून येईल. आमच्यासारखी माणसं कशी जगतात – कसं आयुष्य घालवतात – ते पाहू दे त्याला. म्हणजे शिकेल काही शिकला तर. काय ? आलं का लक्षात ? का नाही ?"

" उफ ! झालं पुन्हा सुरू ! जरासा कुठं तोंडातून शब्द बाहेर पडला की लगेच– 'चल, चालता हो. गाव सोडून निघून जा कुठं !' नेहमी नेहमी हे असं का बोलत असता, ते तरी थोडं सांगा ?"

" अग ! याला नाही अक्कल. "

" पण इतरांना तर खूप आहे ना ! "

अम्मीच्या या टोमण्यावर अब्बा काय स्वस्थ बसतील होय ?

" अग याच्यात उतरलीय ती तुझी अक्कल. समजलं ? की नाही ?"

" अस्सं ! अलीकडे माझी अक्कल कामातनं गेलीय खरी, काय करणार ! अल्लाची मर्जी !"

" अग ! नाही तर ह्याला असं बोलायला सुचतं ? सांग बरं ? माझ्या धाकट्या भावांची सर्व मिळून सव्वीस मुलं, तुझ्या धाकट्या भावा-बहिणींची सर्व मिळून एक्केचाळीस ! ते सारेच्या सारे इथं राहायला येतात, खाऊन पिऊन-फस्त करतात. त्याबद्दल मी एक अवाक्षर तरी कधी काढतो का ? नाही ना ?"

" अरे देवा ! हे असलं कसलं बोलणं काढलंय आज ! "

" अग ! तू आणखी दहा हजार देवांचा धावा केलास म्हणून काय तुला अक्कल

येणार आहे ? माझं बोलणं तुझ्या टाळक्यात शिरणार आहे ? छे, छे, नाव नको."

" असं आहे तर मग लिहून दाखवा ना काय म्हणायचंय ते !"

अम्मी अक्षरशत्रू आहे. त्यामुळं तिच्या त्या विधानावर अब्बा खो खो करून हसले. अम्मीचा पांढरा शुभ्र ब्लाऊझ थुंकीच्या लाल फवाऱ्यानं रंगून निघाला.

"जा इथनं," अब्बांनी हुकूम सोडला–" जाऊन तो ब्लाऊझ बदलून ये. समजलं ? का नाही ?"

अम्मी उठली अन् ब्लाऊझ बदलून आली. अब्बांनी बोलणं सुरू केलं–" म्हणे लिहून दाखवा. तुझा बाप शिकला होता का कधी लिहायला ? अन तुझे भाऊतरी शिकले होते का कधी लिहायला ? नाही ना ?"

अम्मी यावर थोडीच गप्प बसणार होती. ती ताडकन म्हणाली, " आमचं राहो– तुमची सर्व मंडळी तर खूप शिकलेली आहेत ना ? मग पुष्कळ झालं !"

अब्बा बराच वेळ ह्यावर काही एक बोलले नाहीत. ते स्वतः लिहाय-वाचायला शिकले नव्हते की त्यांचे आई-वडील शिकले नव्हते. अम्मीनं त्यांच्या वर्मावरच बोट ठेवल्यामुळं त्यांना भयंकर राग आला.

" खूप थकलीस," अब्बा जोरानं कडाडले, "लाथा मारमारून भुस्कट पाडीन. लक्षात आलं का ? की नाही ?"

अम्मी यावर आणखी काही प्रत्युत्तर करती तर निष्कारण भांडणाला तोंड लागलं असतं. अब्बांनी पानदान सरळ अंगणात भिरकावून दिलं असतं. अम्मीला मारलं असतं, मजीदला अन त्याच्या बहिणींनाही चोपलं असतं. इतकंच नाही तर, मजीदनं लावलेली सारी झाडंझुडपं उपटून फेकून द्यायला कमी केलं नसतं त्यांनी. हे सारं जाणून अम्मी काहीच बोलली नाही. गप्प बसली.

अम्मी अशी गप्प बसून राहिली तेव्हा अब्बांनी विचारलं, "का ग ! जीभ टाळ्याला चिकटलीय की काय आता ?"

अम्मीनं अगदी शांतपणं विचारलं, " हे सारं कशासाठी, का म्हणून बोलता आहात ? मजीद एक खुळ्यासारखं विचारून बसला; पण अल्लाच्या अन वडील-धाऱ्यांच्या कृपा-आशीर्वादानं आपल्याकडं भरपूर पैसा आहे. आता सुहराच्या वड-लांचं देहावसान झालं आहे. त्या मंडळींना कोणाचा आधार उरलेला नाही. अशा परिस्थितीत सुहराच्या शिक्षणाची जबाबदारी आपण उचलली तर त्यात वाईट ते काय आहे ?"

मजीदनं औत्सुक्यानं अम्मीकडं पाहिलं. तिच्या गळ्याकानांतले सुवर्णालंकार चमकत होते.

"हो ग ! आमच्यापाशी हवा तेवढा पैसा आहे, पण तो काय तुझ्या बापानं कमावून आणलाय ? की हुंड्यादाखल बरोबर घेऊन आलीस ?"

"ओ हो ! झालं यांचं पुन्हा सुरू–हुंडा ! जसं काही तसंच लग्न लावून आणलंत की नाही ! मोजून हजार रुपये दिले होते अन वर त्याशिवाय हातांत, गळ्यात, कानांत, पायांत आणि कमरेत घालण्यासाठी दागिन्यांच्या रूपानं किती तोळे सोनं दिलं–ते सारं विसरलात वाटतं !"

"हां हां !" अब्बांनी मिशीवर ताव देत म्हटलं, "त्या हजार रुपड्या–अग ! तुझ्या भारंभार रुपये जरी मोजले असते तरी तुझ्यासारख्या मूर्ख बाईशी लग्न करायला कुणी उभा राहिला असता काय ? खरं की नाही ?"

"तर मग आता कुणी हुशार मैना लग्न लावून आणा–"

"लग्न लावून आणीन ! जरूर आणीन. माझ्यासारख्या योग्य पुरुषाला हजारच काय ग, दहा हजार रुपये मोजून आपली पोरगी लग्नात द्यायला लोक तयार आहेत, समजलं ? का नाही ?"

अम्मी पुन्हा गप्प झाली. अब्बा तर काय मनाला येईल तितक्या बायकांशी लग्न करू शकतात. अम्मीनं काहीच उत्तर दिलं नाही, म्हणून अब्बांच्या रागाचा पारा पुन्हा चढला.

"बघितलंत, काय म्हणाली ती ? आमच्याजवळ हव्वा तेवढा पैसा आहे."

अब्बांनी हे शब्द अशा थाटात उच्चारले की जणू काही त्यांना सुचवायचं होतं की त्यांच्याजवळ एक फुटकी कपर्दिकही नाही. वस्तुस्थितीची मजीदला पूर्ण कल्पना होती. त्या भागात अब्बा सर्वांत श्रीमंत होते. एका वेळी जे नारळ उतरविले जात त्यांची डोंगराएवढी रास उभी राही. एका वेळी मळणी करून जे धान्य आणीत ते साठवायला जागा पुरी पडत नसे. ह्याव्यतिरिक्त लाकडाच्या व्यापारातही त्यांना भरपूर प्राप्ती होत होती. एकदा असंच लाकूडविक्रीचा सौदा पुरा करून घरी आले होते, तर बरोबर आणल्या होत्या साऱ्या सोन्याच्या मोहरा. पांढरा शुभ्र कागद पसरून त्यावर त्यांनी त्या मोहरांची रास रचली. बत्तीच्या प्रकाशात मोहरा मोजून मोजून थैल्या बांधणं त्यांनी सुरू केलं अन मग त्या साऱ्या थैल्या लोखंडी तिजोरीत व्यवस्थित रचून तिजोरीला कुलूप ठोकलं. त्याआधी त्या हातात घेऊन मजीद त्यांच्याशी खूप खेळला होता. त्यांचा सोनेरी रंग अन मंद-मधुर किणकिणाटा तो

आजवर विसरू शकला नव्हता. एवढा श्रीमंत माणूस एका गरीब मुलीला शिकवू शकत नाही !

अम्मीनं म्हटलं, " नाहीय असं म्हणू नका. आमच्यापाशी आहे. ह्या गावातल्या कोणाहीपेक्षा अधिक वैभव आमच्यापाशी नाहीय काय ? मजीदसाठी होतो तेवढाच फारतर खर्च होईल त्या सुहराचं शिक्षण करण्यात ? "

अब्बांना राग आला – म्हणाले, " तुला अक्कलच नाही तर तुझ्या टाळक्यात काही शिरणार आहे का काही ? तुझ्या-माझ्या रक्तामासाच्या नात्याची सारी मिळून किती आहेत, माहीत आहे तुला ? नाही. सव्वीस अन एक्केचाळीस मिळून किती होतात माहीत आहे तुला ? नाही. "

अम्मीनं विचारलं – " किती होतात रे, मजीद ? "

मजीदला घाम फुटला – तो कागदपेन्सिल आणायला म्हणून धावला.

अब्बा मोठ्या उपहासानं हसत म्हणाले, " तो गेला ग ! तुझ्या बुद्धीचा वारसा...... "

मजीद कागद अन पेन्सिल घेऊन परत आला. त्यानं २६च्या खाली ४१ लिहिले अन पुन्हा घामानं डबडबत बेरीज करायला सुरवात केली. हसत हसत अब्बा म्हणाले सदुसष्ट. तोपर्यंत मजीदचीही बेरीज पुरी झाली होती. त्यानंही आपली सम्मती दर्शवीत म्हटलं, " हां, सदुसष्ठ, बरोबर आहे. "

अब्बा जोरानं खेकसले, " चल जा इथनं. "

अन मग ते म्हणाले, " ऐक ग ! ती सुहरा चांगली मुलगी आहे. हुशार आहे. पण आपण तिला शिकवायचं म्हटलं म्हणजे त्याआधी ह्या सदुसष्टांना शिकवावं लागेल. ह्यासाठी पुरेसे पैसे आहेत आपल्याकडं ? "

अम्मीनं काहीच उत्तर दिलं नाही.

" हा गेला नाही अजून इथनं – " मजीदला तिथंच अजून उभं पाहून अब्बा पुन्हा ओरडले – " चल जा तिकडं. "

मजीद मनात विलक्षण कष्टी होत तिथून निघून गेला. खिडकीजवळ अंधारात बसून त्यानं सुहराच्या घराकडं पाहिलं तर पडवीत हातावर हनुवटी टेकवून, पुढच्यातल्या पणतीच्या ज्योतीकडं एकाग्रतेनं पहाणारी, चिंताग्रस्त अशी सुहरा त्याच्या दृष्टीस पडली.

## ७

सुहराचं आयुष्य असंच अर्थविहीन निरुद्देश व्यतीत होत होतं. बहुतेक वेळ ती मजीदच्याच घरी असायची. तिथली सारी मंडळी तिच्यावर माया करायची. तरीही एका अनामिक औदासीन्यानं तिची मुद्रा सदैव झाकाळलेली असायची. मजीदची आई तर तिला नेहमी म्हणायची : "काही का कारण असेना, असं दुःखी कष्टी राहू नये कधी."

"मला कसलं काही दुःख नाही." सुहरा हसत हसत उत्तर द्यायची. तरीही आपल्या आवाजात दडलेला विषाद तिला कधी छपवून ठेवता आला नाही. त्यामुळं मजीदलाही मनोमन भारी दुःख होत असे.

तो म्हणायचा, "सुहराचं पहिल्यासारखं दिलखुलास हसणं कानी पडावं यासाठी माझा जीव कसा आसुसलाय ! तगमग तगमग करतोय."

"का ? पहिल्यासारखी हसत नाही मी ?" ती उत्तर देई.

"नाही, वाटतं की तुझ्या हास्यात जणू आसू दडलेले आहेत."

"ओह ! मी आता मोठी झालेय ना, म्हणून होत असेल कदाचित हे असं......" नंतर आपलं वाक्य पुरं करीत ती म्हणायची, "आपण सारे मोठे न होतो तर कित्ती कित्ती चांगलं झालं असतं !"

वाढत्या वयापोटी का दुःख अन इच्छा, अभिलाषा अन जाणिवा माणसाच्या मनात मूळ धरायला लागतात ?

ते लहान होते. पाहता पाहता स्वतःला नकळत ती दोघं मोठी झाली. वयात आली. सुहराचा वक्षभाग फुगीर झाला, केशसंभार वाढला, युवती झाली ती. आन मजीदही वरच्या ओठावर इवलीशी मिसरुड वागवणारा तरुण बनला.

आपल्या भवितव्याविषयी सुहराच्या मनात एक भयाची भावना आहे. वहिणी, आई अन स्वतः ती अनाथ आहेत. वडिलांच्या मृत्यूनंतर कुटुंबाच्या चरितार्थाचा, पालनपोषणाचा भार तिच्या कोवळ्या खांद्यावर येऊन पडला आहे.

ती अवघी सोळा वर्षांची आहे. अन तरीही कुटुंबाच्या रक्षणाची जबाबदारी तिच्यावरच आहे. मजीदच्या आईची मदत किती अन कुठवर घेत राहील ती ? दुसऱ्यांच्या चांगुलपणाच्या आधारानं जीव जगवायचा – आयुष्य काढायचं ? हां, एक केवळ मजीदकडनंच ही भलाई स्वीकारावी लागली असती तर ते एवढं मनाला सललं बोचलं नसतं. त्याची खंत वाटायचं फारसं कारण नव्हतं.

मजीदच्या वडील, आई वा बहिणींविषयी सुहराच्या मनात कसला काही विकल्प वा वाईटपणा नाही. परंतु मजीदविषयी अंतर्यामी जे वाटतं त्या भावनेचं प्रत्यंतर त्यांच्या बाबतीत येत नाही हेही खरं आहे. मजीद आवतीभोवती असला म्हणजे कसलं दु:ख–कष्ट तिला जाणवत नाही, परंतु तो दृष्टीआड झाला की तिचं मन काळवंडून गेल्यासारखं होतं. मजीद सकाळी शाळेत जातो. संध्याकाळी तो परत येईपर्यंत तिच्या जिवात जीव नसतो. जिवाला घोर लागल्यासारखी अवस्था होते तिची. मजीदचं जरा कुठं काही दुखलं खुपलं, जरा कुठं काही त्याला बरं नसलं तर रात्रभर डोळ्याला डोळा लागत नाही तिचा. नेहमी त्याच्याजवळ बसून असावं – रात्रंदिवस त्याची सेवा करावी हाच एक ध्यास तिच्या मनाला असतो.

त्याची सेवा करावी अशी जी तिच्या मनाला एक आस लागून राहिली होती ती जणू सफल व्हावी अशीच एक घटना मध्यंतरी घडून गेली. शहरातल्या शाळेत शिकत असताना चौथ्या वर्षातली गोष्ट : मजीदच्या डाव्या पायाच्या तळव्याला कसलासा विषारी दगड लागून जखम झाली. शाळेतून परत येतानाच पाय दुखायला लागला त्याचा. लंगडत लंगडत चालत तो कसा तरी घरी येऊन पोहचला. दुसऱ्या दिवशी तळवा एके ठिकाणी पिकल्यासारखा दिसायला लागला. सारं अंग कसकसून येऊन ठणका लागल्यासारखं झालं. मजीद पलंगावर पडल्या पडल्या 'अग आई गऽ, अग आई गऽ' करीत एकसारखा कण्हत होता. सारे म्हणायला लागले, फोड फुटला की ठणका कमी होईल – बरं वाटेल. परंतु कोणी जरा जरी जवळ आलं तरी मजीद रडून ओरडून हलकल्लोळ करून सोडायचा. त्याच्याभोवती त्याला पहायला येणाऱ्यांचा सदैव घोळका असायचा. चुकून माकून जवळ कुणी नाही तो एकटाच आहे अशी अलभ्य संधी सापडताच सुहरा त्याच्या खोलीत जायची, त्याच्या पायाशी बसून हलक्या हातांनी पाय हातात घेऊन त्या दुखऱ्या भागावर फुंकर घालायची. तळव्याचा फोड चांगला एखाद्या पेरूसारखा पिवळा धमक होऊन टरारला होता. त्याचा ठणका मजीदच्यानं सहन होत नसे. अगदी कासावीस होत तो पुटपुटला, "सुहरा, मी नाही जगत आता ह्यात. ..."

त्याला बरं वाटावं, आराम पडावा म्हणून काय करावं हेच तिला उमगत नव्हतं. त्याच्या त्या बोलण्यानं तिलाही रडू कोसळे. तिनं हलकेच मजीदच्या डाव्या पायाच्या दुखऱ्या तळव्यावर आपला गाल दाबून धरला. मग तळवा हलकेच दाबीत, तिनं त्याचं आवेगानं चुंबन घेतलं.

पहिलं चुंबन !

ती जागची उठली अन तापानं कढत झालेल्या मजीदच्या कपाळावरून हळुवार-पणं हात फिरवू लागली ... त्याच्या तोंडावर वाकली. तिचे निःश्वास त्याच्या मुखमंडलाला स्पर्श करू लागले. त्याच्या धमन्यांतून जणू वीज सळाळत गेली. चुंबकानं आकृष्ट केलेल्या लोहवत त्यानं आपलं तोंड जरा वर उचललं अन त्याचे दोन्ही हात पुष्पमालेप्रमाणे सुहराच्या गळ्याभोवती वेढले गेले. त्यानं तिला आपल्या हृदयाशी धरून घट्ट कवटाळलं.

" सुहरा ! ... माझ्या प्राणा ! "

सुहराचे आरक्त अधर मजीदच्या ओठांवर विसावले ... आवेगानं भिडले. अंतरंगात उपजतच असलेले विकार भाव आता प्रथमच असे जागृत झाले होते. त्यांच्या सळाळत्या आवेगना शरण जात ते द्वैत विसरले ... एकात्म झाले. एकमेकांना त्यांनी हजार हजार चुंबनं अर्पण केली. डोळ्यांवर, कपाळावर, गालांवर, गळ्यावर आणि वक्षभागावरही चुंबनांची वृष्टी होत होती ... सारं शरीर कंपित होत होतं. एक प्रकारची सुखदायक तंद्रा प्रत्ययाला येत होती ! अन एक अनोखा दिलासा अनुभवाला येत होता. काही तरी घडलं, काय होतं ते ?

" फोड फुटला ... " मंदमधुर स्मित करीत सुहरा म्हणाली. जणू एक दिव्य संगीत कानाला स्पर्श करून गेलंय. असा भास मजीदला झाला. तो उठून बसला. अहो आश्चर्यम् ! फोड खरोखरीच फुटला होता. लाजून लाल झालेल्या सुहराच्या प्रेमार्द्र मुखमंडलाकडं त्यानं पाहिलं. पोवळ्यांसारख्या लालचुटुक अशा त्या ओठांचं माधुर्य ! त्या पहिल्या वहिल्या चुंबनातली मादकता !

डाव्या पायाच्या तळव्याचं सुहरानं ज्या जागी चुंबन घेतलं होतं तिथं एक अनिर्वचनीय शीतलता आता प्रत्ययाला येत होती.

त्या रात्री सुहराच्या डोळ्याला डोळा कसा तो लागला नाही. सारं काही कढत झालं अन एकदम वितळलं.

सुहराचं एक जीवनस्वप्न आहे. पण त्याच्या साफल्याचा विचार करायलादेखील तिचं मन कचरतं – तिला भय वाटतं.

एका विलक्षण अनिश्चिततेत तिच्या दिवस अन रात्री धारेला लागल्यागत वाहू लागल्या.

# ८

सुहराचं मजीदवर प्रेम आहे. मजीदचंही सुहरावर प्रेम आहे. दोघांनाही या गोष्टीची जाणीव आहे. मजीद स्नेहपाशात बद्ध आहे अन तरीही, ऊर्जस्वल विचार अन उत्कृष्ट आचार ह्या त्याच्या नियामक शक्ती आहेत. स्वाभिमान तर त्याच्या जीवनाचा स्थायीभाव आहे. स्वतःविषयीची त्याला उत्तम जाण आहे. त्याचं जीवन त्याच्या वडिलांच्या विश्वात नाही. दोघांचंही जीवनविश्व सर्वस्वी भिन्न आहे. वेगवेगळं आहे. घराच्या कुठल्याही विषयात त्याला काहीही गम्य नाही. आपल्या वडिलांशी काही बोलायं-बिलायचं म्हणजे त्याला भारी भय वाटतं.

अब्बा – त्याचे वडील–आपल्या मनचे राजे आहेत. ते घरात कोणाला न विचारता सवरता स्वतःच्या मनाला येईल तसं वागत असतात. मजीदला एखादी गोष्ट हवी असली म्हणजे आपल्या आईला सांगून ती तो मागून घेई. वडिलांचा साधा आवाज कानी पडला तरी त्याचं मन विरोधानं गर्जून उठे. हा विरोध का – कशासाठी ? याचा मजीदला स्वतःलाच पत्ता नव्हता. काय ते वडील म्हणून चांगले नव्हते ? मजीदला त्यांनी कशात काही कमी केलं होतं ? कुठं उणं पडू दिलं होतं ? एक बाप म्हणून त्यांच्यात काय दोष, कोणता उणेपणा आहे ?

आपल्या वडिलांहूनही अधिक प्रेम अन अधिक आदर सुहराच्या वडिलांविषयी वाटायचा मजीदला. सुहराला आपल्या वडिलांचं कधीही कसलं भयत्रोय वाटायचं नाही. त्यांच्याविषयी ती एकदा बोलायला लागली की तिचे डोळे भरून येत. पण मजीदच्या वडिलांचं देहावसन झालं तर मजीदला वाईट वाटेल ? रडू कोसळेल ? अम्मीजान गेली तर मात्र त्याला फार फार रड येईल.

काही का असेना, त्या घरात राहणं मजीदला मुळीच आवडत नव्हतं. बहुत करून तो बाहेर बाहेरच असायचा, नाहीतर आपल्या खोलीत–एकटाच. अशा प्रकारे त्याचे आयुष्य व्यतीत होत होते. ह्या दरम्यान एक मोठी घटना घडली.

मजीद त्या वेळी शहरातल्या शाळेत उपान्त्य वर्गात शिकत होता. पिकं कापून गोळा करण्याचं काम सुरू झालं होतं. उन्हाळा भयंकर होता अन त्यात पुन्हा रोजा[1]चे दिवस ! त्याचे अब्बा दिवसभर उपास करीत, कडकडित, पाणी प्यायचे

---

१. रोजा-उपवास, मुसलमानांचे नक्त.

नाहीत की थुंक गिळायचे नाहीत. अशा परिस्थितीतही ते एवढ्यातेवढ्या कामासाठी धावाधाव करीत.

एक दिवस सकाळी शेतावर जायच्या आधी अब्बानं मजीदला म्हटलं, "धान्य कापून मुकवलंय. ते नावेत भरून आणायचंय. बरोबर स्वत: मालक नसेल तर नावाडी ते चोरून विकायला कमी करणार नाहीत. तू तर काही रोजे पाळत नाहीस. शाळेतून परत येताच सरळ शेतावर ये. येशील ना? की नाही?"

मजीद म्हणाला, "हो येईन."

पण तो गेला नाही. रोजच्यासारखं शाळेतून आल्या आल्या तो खेळायला म्हणून निघून गेला. रात्री उपवास सोडायच्या वेळी अब्बा कुठं दिसले नाहीत. तेव्हा कुठं मजीदला आठवण झाली. बरीच रात्र झाल्यावर अब्बा परत आले. मजीद दृष्टीला पडताच कडाडून गरजले. भयानक संतापानं त्यांनी त्याच्या गालावर खाडकन एक थप्पड ठेवून दिली! मजीद भेलकांडतच गेला. त्याच्या मस्तकात झिणझिण्या उठल्या अन डोळ्यांसमोर जणू हजार काजवे चमकून उठावेत तसं झालं. नंतर अब्बांनी त्याला खूप मारलं—"एक तर तू सुधर; नाही तर मर. लक्षात आलं? का नाही?" माराचा आवाज ऐकून अम्मी धावतच तिथं आली अन तिनं दोन्ही हातांनी त्याला कवटाळून धरलं.

"पुरे आता! इतकं मारलंत ते पुरे नाही का झालं?" अम्मी म्हणाली.

"जा, तिकडं!" अब्बा कडाडून म्हणाले; "ऐकलं नाहीस मी काय म्हणतोय ते तू?" मग त्यांनी अम्मीलाही मारलं. बहिणी रडत ओरडत तिथं आल्या तर त्यांचाही त्यांनी खरपूस समाचार घेतला. दरवाजा तोडून टाकला. भांडीकुंडी फेकून देत देत फोडून तोडून टाकली. ह्या साऱ्या गदारोळात मजीद स्वस्थ उभा होता.

"जा रे, चालता हो इथून! सारे जग भटकून थोडा धडा, थोडं शहाणपण शिकून ये! टाळक्यात शिरलं की नाही?" आरडा-ओरडा करीत अब्बानं म्हटलं आणि मानगूट पकडून त्यांनी त्याला अंगणात ढकलून दिलं. मजीदचे ओठ फुटले आणि रक्त वहायला लागले. स्वत:ला सावरीत तो कसाबसा उठून उभा राहिला. तो अब्बा पुन्हा आरडा-ओरडा करीत त्याच्या अंगावर धावून गेले. कडाडले, "चल नीघ. चालता हो इथनं!"

जगाच्या दुसऱ्या टोकाकडं धाव घ्यायला मजीदच्या लेखी तेवढं ते पुरेसं होतं. झटक्यात तो घराबाहेर पडला – उंबरठ्याबाहेर आला. त्याला रडू फुटता फुटत नव्हतं. जणू रडण्यासाठी त्याच्याजवळ अश्रूच शिल्लक उरले नव्हते. परस्परविरोधी

विचारांचं एक भयानक वादळ त्याच्या अंतर्यामी थैमान घालीत होतं. थोडी सहानु-भूती दाखवून त्याचं मन शांत करायला, त्याची समजूत काढायला त्या क्षणी तिथं कुणीच नव्हतं.

आत घरात एक भयानक स्तब्धता पसरली होती. दिव्याचा लख्ख प्रकाश चारी दिशांना पसरला होता अन तरीही तिथं कसलीच हालचाल प्रत्ययास येत नव्हती. वाटावं; आत्ताच जणू कुणी ह्या घरातून गेलंय – नुकतंच कुणाचं तरी इथं देहावसान झालंय.

ह्या अफाट जगात तो एकटा होता. घरदार सोडून निघून जायचा विचार त्याच्या मनानं पक्का केला. पण जाणार कुठं ? हातात एकही पैसा नाही – आहे तो फक्त एक स्वतःचा देह. जगणार कशाच्या जिवावर ? असो – तरुण तर आहे. जायचं हे निश्चित.

आणि तो तिथनं चालता झाला.

प्रथम त्याची पावलं सुहराच्या दिशेनं वळली. त्या आंब्याच्या झाडाखाली – जिथं ती दोघं नेहमी बसायची तिकडं. तिथल्या त्या एकांत अंधकारात जाऊन तो उभा राहिला.

दूर सुहराचा गोड आवाज निनादत होता. पुढच्यातल्या पणतीच्या मंद प्रकाशात ती पवित्र कुराण पढत होती. मध्येंच तिनं मान उंचावून त्या आंब्याच्या झाडाकडं पाहिलं. तिची नजर एकाग्र झाली – जणू साव चित्तानं ती काही ऐकत होती. तिचे सतेज गाल उजळून निघाल्यासारखे झाले. रक्तवर्णी ओष्ठद्वय क्षणमात्र विलगले.

थोडा वेळ ती तशाच अवस्थेत बसून राहिली अन मग तिनं पुन्हा पवित्र कुराणाचं वाचन सुरू केलं.

" सुहरा ! " मजीदनं हाक मारली. पण त्याचे ओठ बंद होते. खरं म्हणजे हाक मारली होती ती त्याच्या हृदयानं खूप जोरानं हाक मारावी – तिचा अखेरचा निरोप एकदा घ्यावा असं पुनःपुन्हा मनात येत होतं – पण नाही – घट्ट मनानं त्यानं पाऊल उचललं अन वेडावल्यागत तिथून झपाट्यानं तो चालता झाला. गाव मागं पडलं, शहर मागं पडलं, जंगल, पर्वतराजी आणि शहर या साऱ्यांकडं पाठ वळवीत तो तिथून निघून गेला.

सात वर्षं त्याची ही अशी भ्रमंती चालू होती. प्रदीर्घ सात वर्षं ! मध्यंतरीच्या काळात घरी काय घडलं, सुहराच्या जीवनात काय उलथापालथ झाली – ह्यातलं त्याला काही म्हणता काही समजलं नाही. त्यानं कोणाला काही पत्रबित्र लिहिलं

नाही – जाणून घ्यायची उत्सुकता नव्हती म्हणून नव्हे. पण नाही लिहिलं खरं – घरून कुणी त्याला शोधीत-बिधीत आलं तर ...?

त्यानं भ्रमंती केली. पायी, वाहनातनं, भिकाऱ्यांच्या तांड्यावरोबर, गोसाव्यांच्या जथ्यात सामील होऊन, संन्याश्याचा शिष्य-चेला बनून, हॉटेलातनं नोकऱ्या करीत, व्यापाऱ्यांकडं अडत्या म्हणून काम करीत, राष्ट्रीय चळवळीत भाग घेणाऱ्यांच्या संगतीत राहून, श्रीमंत सावकारांचा पाहुणा बनून– अशा नानाविध स्वरूपांत त्यानं जीवन व्यतीत केलं. कित्येक धर्ममार्तंडांशी त्याचा परिचय झाला.

त्या काळात पैसा कमावण्याची त्याला लेशमात्र इच्छा नव्हती. प्राप्त संधीचा त्यानं कधी फायदा करून घेतला नाही. पहावं, जाणून घ्यावं, शिकावं–हेच एकमेव ध्येय त्याच्यापुढं होतं.

त्यानं पाहिली छोटी छोटी खेडी आणि मोठी मोठी शहरं, इवलाले निर्झर आणि विशाल पात्रातून दुथडी वहात जाणाऱ्या मोठाल्या नद्या, छोट्या छोट्या डोंगर-टेकड्या आणि उत्तुंग पर्वतराजी, धूळ आणि मातीनं भरलेली शेतजमीन आणि पांढऱ्या शुभ्र रेतीनं ओसंडणारे विशाल वाळवंट–अशा प्रकारे सहस्रावधी मैलांची भ्रमंती त्यानं केली. काय पाहण्यासाठी ? काय ऐकण्यासाठी ?

कुठंही जा माणूस इथूनतिथून सारखाच–भाषा, पेहराव आणि वेषभूषा भिन्न भिन्न इतकंच ! सारे स्त्री-पुरुष जन्माला येतात, लहानाचे मोठे होतात, एकत्र येऊन प्रजोत्पत्ती करतात आणि अखेर मरतात. बस्स ! जन्म आणि मृत्यूच्या दरम्यान भोगावा लागणारा कठोर जीवनकलह सर्वत्र सारखाच आहे. तर मग मृत्यूबरो-बरच सर्व गोष्टींचा अंत होतो का ? सारं काही संपुष्टात येतं का ? अशा प्रकारच्या विषादयुक्त भावनांनी प्रेरित होऊन तो आपल्या गावी परत जाण्यासाठी निघाला. कशासाठी ? सुहराबरोबर लग्न करून उर्वरित आयुष्य कुठंतरी निवांतपणं घालवावं ह्या उद्देशानं.

परंतु त्याला दिङ्मूढ करून सोडणाऱ्या बदलत्या परिस्थितीशी लढा देणं भाग पडलं. अब्बांना लागोपाठ त्यांच्या धंद्यात नुकसान सोसावं लागलं होतं. त्यामुळं असेल किंवा सरकारकडून फार मोठी रक्कम कर्जाऊ घेतली आहे अशा अर्थाच्या कोण्या करारावर अजाणतेपणी सही केल्यामुळं असेल, अब्बांची सारी संपत्ती साव-कारांच्या घशात गेली होती. रहातं घरही सावकाराकडं गहाण पडलं होतं. अम्मी आणि अब्बा दोघेही आता वृद्धापकाळामुळे पार थकल्यासारखे झाले होते. दोन्ही बहिणींची लग्नाची वर्षं कधीच टळली होती. आणि... सुहराचं लग्न होऊन गेलं

होतं. मजीद गावी पोहचायच्या एक वर्ष आधीच तिचं लग्न झालं होतं. शहरात राहाणारा कोणी कसाई तिचा नवरा होता.

सुहरानं मजीदची वाट पाहिली नाही. त्यावरून मजीदनं निष्कर्ष काढला की, "मानवी जीवन अखेर स्वार्थी आहे हेच खरं !"

काहीही असो, शेजार-पाजारची मंडळी मजीदला भेटायला आली. त्याची ट्रंक, बाडबिस्तरा, सामानसुमान वगैरे घरी वाहून आणायला चार माणसं लागली; त्यावरून त्यानं बरीच माया केली असावी असा त्या सर्वांचा आपला तर्क झाला. पण त्यात एवढं असं होतं तरी काय ? बरीचशी पुस्तकं आणि एक दहाची नोट !

सुरुवातीसुरुवातीला मजीदला सर्वांकडून मोठ्या अगत्यानं बोलावणी–आमंत्रणं होत होती. एकेका घरी दोनदोनदा, तीनतीनदा पाहुणचार स्वीकारावा लागायचा. पोट भरलेलं असलं तरी आग्रह कर करून खायला घालीत होते लोक. परंतु उण्या-पुऱ्या महिन्याभरातच लोकांना वस्तुस्थितीची कल्पना येऊन चुकली. दारिद्र्यानं ग्रासलेल्या ह्या कुटुंबातला आणखी एक दरिद्री माणूस आहे झालं ह्या भावनेनं ते त्याच्याकडं पाहू लागले !

"कशासाठी परत आलाय तो ?" लोकांना प्रश्न पडला– "सात वर्षांनी परत आलाय, पण निव्वळ रिकाम्या हातांनी, भिकाऱ्यागत !"

आता त्याचं आगत-स्वागत कुचाळकीच्या, तुच्छतेच्या भावनेनं होऊं लागलं. सर्वत्र त्याचा उपहास होऊ लागला तसं त्यानं घराबाहेर पडणंच सोडून दिलं. दिवसभर आपल्या त्या खोलीत तो स्वतःला कोंडून घ्यायचा. त्याच्या आयुष्यातले कितीतरी घटनाप्रसंग, लहानमोठ्या आठवणी त्या खोलीशी निगडित होत्या. जणू त्याचं ते भावविश्व होतं. शाळेत शिकत असताना याच खोलीत त्याचं वास्तव्य असायचं. त्याचा सुन्नत-संस्कार याच खोलीत झाला होता. पायाला गळू झालं तेव्हाही ह्याच खोलीत बरं होण्याची वाट पाहात बिछान्यात पडून राहिला होता तो. आता त्या ह्याच खोलीत एका जुनाट आरामखुर्चीत पडून बाहेर नजर लावून तो दिवसभर पडलेला असायचा.

घरात वेळेला दोन घास मिळायचीही वानवा होती. त्याच्या बहिणी नारळाचा काथ्या कुटून, दोर वळीत, त्याचे अब्बा ते बाजारात विकून त्यातनं जे काही मिळेल ते घरी घेऊन येत. मजीदची आई त्यातलं जास्तीत जास्त मजीदला खाऊ घालायची–म्हणायची, "पहा माझं पोर किती अशक्त झालंय ते ! कशी हाडं निघाली-यत त्याची ! अरे, लहानपणी ह्यं कसं पालनपोषण केलं होतं माहीताय तुला ?

पोरा, फिक्कटलेला दिसायचास तू लहानपणी ! त्यासाठी किती सोनं दुधात उगाळून उगाळून तुला पाजलं कल्पना आहे तुला त्याची !"

मजीद शून्यपणे एकटक दृष्टी लावून सदासर्वकाळ आरामखुर्चीत पडलेला असायच –काय करणार, हातात एक दमडा नाही, पैसा मिळण्याचा काही मार्ग नाही, मदत करायलाही कोणी नाही.

दिवसेंदिवस तो खंगतच चालला. जरा मन गुंतवावं म्हणून त्यानं बाग लावायला सुरुवात केली. पण आता मात्र तो एकटाच होता. जोडीला तेव्हासारखी सुहरा नव्हती बाग लावायला.

अंगणाच्या मध्यभागी पांढरी शुभ्र वाळू पसरून त्यानं चारी बाजूंना कलमं लावली. सुहरानं ज्याचं कलम स्वतःच्या हातानं लावलं होतं ते जास्वंदीचं झाड एका अंगाला उभं होतं. आता ते केवढं तरी मोठं झालं होतं. तो नव्यानं घरी परतला त्या वेळी ते झाड फुलांनी नुसतं बहरलं होतं, हिरव्या कंच पर्णसंभारानं जणू काही रक्त बिंदूंचा शिडकावाच झालाय असा भास व्हावा अशी लाल जर्द फुलं त्यावर सदान् कदा फुललेली असायची. त्याच्या छायेत आरामखुर्चीवर पडल्या पडल्या तो सर्देव वाचनात मग्न असायचा. पण खरंच का तो वाचनात एवढा मग्न असायचा ! उघडं पुस्तक मांडीवर ठेवून तो आपला असाच विचार करीत पडलेला असायचा !

अम्मी विचारायची, " कसला विचार करतोयस, बेटा ? " तो गंभीर आवाजात उत्तर द्यायचा, " छे: कुठं काय– कसला विचार काही नाही – पडलोय उगाच आपला हा असाच... "

त्याच्या उत्तरानं अम्मीचं समाधान व्हायचं नाही– उलट ती काळजीत गढून वेड्यासारखी व्हायची–आपणच म्हणाली– " जे काही घडतं ते अल्लाच्या मर्जीनुसार... "

मजीदला खूप करण्यासाठी त्याच्या आवडत्या झाडारोपट्यांना पाणी घालण्यात दोघा बहिणींत अहमहमिका लागायची. दोघी आपसांत भांडायच्या अन शेवटी दोघीही मजीदकडे जाऊन स्वतंत्रपणं चौकशी करायच्या : " दादा, आज कलमांना पाणी मी घालू का... " मजीद उत्तर द्यायचा, " आता त्यांना जी फुलं येतील ना ती तुम्ही दोघी सारखी वाटून घ्या. "

अब्बा म्हणायचे, " त्याच्या मायचं झाड ! सारी इस्टेट बदनाम करून मी त्याला शिकवलं. सात वर्षं इकडं तिकडं फुकट भटकंती करून अखेर ही कमाई. या वृद्धापकाळात आराम करण्यासाठी हा बगीचा ! " आणि इतकं बोलून ते थू करून

पानाची पिचकारी मारीत म्हणाले, " सारी मी तोडून मोडून उपटून फेकून देईन– ऐकलंस का ग, मी काय म्हटलंय ते ? नाही ? "

अम्मी यावर उत्तर देई, " काही का असेना, सारं अंगण व्यवस्थित साफसूफ तर झालं ? "

अब्बांनी सुक्या पानाला जरासा चुना लावीत विचारलं, " ऐकलं नाहीस का ग, मी काय म्हणतो ते ? नाही. "

" काय म्हणालात ? "

" जा. जरा कुठून तरी थोडी तंबाखू घेऊन ये... "

अम्मी मस्तकावर एक काळजी वागवीत मळकी–फाटकी वस्त्रं सांभाळीत शेजारीपाजारी तंबाखूची उसनवारी करायला निघून गेली.

मजीदच्या हृदयाकाशात ढगांप्रमाणे आठवणी भरून आल्या, सैरभैर इतस्तत: धावू लागल्या. दारिद्र्य हे एक भयानक दुखणं आहे. ते केवळ माणसाच्या देहाचा आणि हृदयाचा नव्हे तर आत्म्याचाही विनाश घडवून आणतं. अशा प्रकारे शरीर, हृदय, आत्मा नष्ट पावलेले लाखो स्त्री-पुरुष त्याने पाहिले आहेत. ती चित्रं रांग धरून त्याच्या हृदयात येऊन उभी राहतात. तीच विकृतीनं व्यापलेली घृणास्पद चित्रं त्याला का म्हणून आठवतात ? जीवन म्हणजे ऊर्जस्वल प्रकाशानं ओसंडून वहाणारं सौंदर्य खरं–पण घाणीनं, चिखलानं बरबटलेली जीवनमुद्रा विसरू म्हणता त्याला विसरता येत नव्हती. जीवनाची विरूपता ! जीवनाची विवशता !

ज्यांना गोळाभर अन्नाची भ्रांत आहे, लज्जारक्षणापुरत्या वस्त्रांचीही ज्यांना वानवा आहे, पाठ टेकायलाही ज्यांना कुठं तसूभर जागा नाही, जे लुळेपांगळे आहेत, दुर्बल आहेत, अपंग आहेत अशा कोट्यवधी हताशांची अंतहीन घोषयात्रा ! रात्रंदिवस हेच तो पाहात होता. सारं विसरून जावंसं वाटत होतं त्याला– पण विसरणार कसा ? डोकं सदा आगीत होरपळत राहायचं...काळजात सदैव खदखद चालू असायची.

सुहराच्या आठवणीसरशी डोळे भरून येत. ती भेटावी, तिला पहावं ह्यासाठी जीव आसुसला होता. पण आता ती दुसऱ्याची झाली होती. परस्त्री होती ! दुरून का होईना पण एकदा तरी तिचं दर्शन घडावं असं त्याच्या जीवाला वाटत होतं ! काही बोल लावावा, तक्रार करावी म्हणून नव्हे. कसलं काही वाक्ताडन करावं, दूषणं द्यावीत म्हणूनही नव्हे–भेट हवी होती ती फक्त एकदा तरी तिला डोळे

भरून पहायला मि... ...ून. तिचा तो परिचित आवाज एकवार तरी कानांवर पडावा म्हणून.

ती मजीदला विसरू शकली. पण मजीद तिला विसरू शकेल ? त्या झाडाखाली, ज्यानं अनेक वार पाडाला आलेली फळं देऊन त्या दोघांना अनुग्रहीत केलं होतं—त्या आंब्याखाली, रात्रीच्या विजन एकांतात मजीद जाऊन उभा राही. कोणाची वाट पहावी म्हणून नव्हे– आणि वाट पहावी असं त्याच्या लेखी आता उरलं तरी होतं कोण ?

मजीदनं विचार केला–' जर सुहराला समजलं की आपण इथं आलोयत...तर कधी फिरकणार नाही पुन्हा ती इकडं. '

# ९

सुहरा आली. ' मजीद आला आहे– ' असं समजताच ती प्रेमाच्या ओढीनं पळून आली.

पण तिची भेट घ्यावी असा उत्साह मजीदला वाटेना. तो अंतर्बाह्य विदीर्ण होऊन गेला होता. जागचं हालवेना त्याला. अपार थकला होता तो.

' कुठं ? ' हा सुहराचा प्रश्न आणि ' बागेत. ' हे अम्मीनं दिलेलं उत्तर, दोन्हीही मजीदनं ऐकली. त्याचं काळीज धडधडत होतं– स्वस्थपणं तो आरामखुर्चीत पडून राहिला.

बाग सायं-प्रकाशात बुडून गेली होती. भृंगे गुंजारव करीत ह्या फुलावरून त्या फुलावर उडत होते. सुगंधित वायुलहरींच्या तालावर पानं डुलत होती. सायंकाळच्या पिवळ्या प्रकाशानं न्हाऊन निघालेला मजीद एखाद्या पुतळ्याप्रमाणं अविचल पडला होता. सुहराच्या पावलांचा आवाज जवळ जवळ येत होता.

पाठीमागून सुहराचे आर्त उद्गार कानी आले. " ओह ! नवी बाग ! "

मजीदच्या काळजात कळ उठली. साधी कळ नव्हती ती. जणू काही तीक्ष्ण

काटयांनी आपलं अंतरंग कुणी शतशः विदीर्ण करतंय असं त्याला वाटलं. राहून राहून ती जीवघेणी कळ काळजात उठत होती– यातना देत होती.

" मला ओळखता का ? "

मजीदचे डोळे भरून आले.

ती परत म्हणाली, " रागावलात आपण माझ्यावर ? "

मजीदनं वळून पाहिलं. जणू त्याच्या काळजात आगडोंब उसळला होता. तोंडावाटे एक शब्द फुटत नव्हता. सुहरा विलक्षण बदलली होती. गाल खप्पड झाले होते, हातांच्या बोटांचा नाजूकपणा नष्ट होऊन ती जाड, राठ आणि खडबडित झालेली दिसत होती. नखं वेडीवाकडी झिजली होती. ओबडधोबड दिसत होती. सारं शरीर पिवळं पडलं होतं. कानांच्या छिद्रांत घातलेले काळे धागे केसांच्या फुग्यांनी झाकले होते. अशा प्रकारे दोघांनी एकमेकांना पाहिलं. कितीतरी वेळ दोघांच्याही तोंडून शब्द फुटेना. हलके हलके सूर्य अंतर्धान पावला. वस्तुमात्रातलं अंतर नष्ट करणारा काळोख दशदिशांतून फैलावला. त्या दोघांनाही ह्याचं मुळीच भान नव्हतं. गावाला वळसा घालून वाहणाऱ्या त्या दोन नद्यांचा प्रवाह रुपेरी रंगात बुडवून टाकणारा चंद्र डोंगरमाथ्यावर उदित होऊन सौम्य शीतल प्रकाशाची बरसात करू लागला.

त्या नीरव स्तब्धतेचा भंग करणाऱ्या एका प्रेमगीताचे स्वर दुरून कुठून तरी कानांवर येत होते. कोणा एका प्रियकरानं आपल्या प्रेयसीला आठवासरशी आर्त माधुर्यानं आळवलं–

" हे कमल पुष्पांच्या
ताटव्यात रहाणाऱ्या,
पंचरंगी पोपटाप्रमाणे
रंगदार पंख असलेल्या
माझ्या प्राणप्रिये,
तुझा फुलासारखा मुखडा
डोळे भरून पहाण्यास
मी अनावर उत्सुक आहे··· "

अशा काहीशा आशयाचे ते प्रेमगीत तो अज्ञात गायक आळवून आळवून गात होता.

अखेर मजीदनं भावपूर्ण स्वरात हाक मारली, " सुहरा ! "

" ओ !" सुहरानं जणू त्या भूतकाळातील प्रेमाच्या कोवळिकेनं प्रतिसाद दिला.

मजीदनं विचारलं, " काय होत होतं– कशानं आजारी होतीस ? "

" छे: कुठं काय– आजारी-विजारी नव्हते काही कधी... " सुहरानं उत्तर दिलं.

" मग एवढी ही वाळलीस ती कशानं ? "

सुहरानं त्याच्या ह्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाही. एक प्रदीर्घ निःश्वास टाकीत ती म्हणाली, " परवाच मला कळलं... आपण आलायत ते– "

जरा रागानंच मजीदनं म्हटलं– " कदाचित वाटलं असेल की मी कधीच परत येणार नाही म्हणून ? "

" सर्वांना असंच वाटत होतं– पण मी... "

" हूं··· ? "

" खात्री होती मला, आपण परत याल याची– "

" अन तरीदेखील··· ? "

" सगळ्यांनी परस्पर विचार करून ठरवलं : मला कुणी साधं विचारलंदेखील नाही– की माझी संमती पाहिली नाही. आईच्या जिवाला नुसता घोर लागून राहिला होता माझ्या लग्नाचा. माझ्या बरोबरीच्या साऱ्या उपवर मुलींची लग्नं कधीच लागून गेली होती. वर्षं उलटली होती. सोनं आणि हुंडा दिल्याखेरीज माझ्याशी कुणी... "

" हुंडा अन सोन्याचे दागिने मिळाल्याखेरीज सुहराशी लग्न करायला एकही व्यक्ती तयार होणार नाही – ह्यावर सुहरानं विश्वास ठेवला– असंच ना ?

" मला विश्वास नव्हता अशातली गोष्ट नाही. एक क्षणदेखील मला विसर पडलेला नव्हता – रात्रंदिवस आठवण काढ काढून मी रडत असायची. काही अडचण, काही आजारपण न येवो, अशी प्रार्थना करायची – रोज-रोज प्रार्थना करीत होते... "

" मी सुहराला विसरलो, असंच सुहराच्या मनानं घेतलं, होय ना ? "

" नाही-नाही, असादेखील विचार कधी माझ्या मनाला शिवला नाही. पण पत्र का नाही पाठवलंत ? "

" बस्स् ! नाही पाठवलं झालं ! अनेक वेळा लिहिलं, पण नाही पाठवलं ! "

" मी रोज पत्राची वाट पहायची. वाटायचं– आज येईल, उद्या येईल... "

" म्हणून हे लग्न... "

" सांगितलं ना मी ! मला मुळी कुणी विचारलंच नाही. आईच्या उरावर

अशी एक धोंड बनून किती दिवस राहाणार होते मी ? काही झालं तरी मी एक स्त्री आहे ? "

" ... ? ... "

" शेवटी घर अन जमीन गहाण टाकून सोनं वगैरे दिलं. लग्न लावून दिलं. "

" तर मग ही अशी वाळलीस कशानं ? "

सुहरा गप्प राहिली.

" सांग सुहरा ! कशानं वाळलीस ही अशी ? "

" काळजीनं–"

" काय ? काळजीनं ?"

" ...हूं...!"

" सुहरा !"

" अं !"

" बोल ना ? "

सुहरा हमसाहमशी हुंदके देत रडू लागली. मग हलके हलके तिनं आपल्या नवऱ्याविषयी सांगायला सुरुवात केली...

" फार संतापी आहेत. त्यांची आणखी एक बायको अन दोन मुलं आहेत. आईकडून मी माझी वाटणी मागून घ्यावी म्हणून माझ्यामागं सदैव लकडा लागलेला असतो. माझ्या धाकट्या वहिणी आहेत ना अजून ? माझ्या हातात काय आहे ? मी नाही म्हणून म्हटलं, की मारतात मग मला. एक दिवस माझ्या पोटात लाथ मारली. मी उलटीची पालटी पडले. त्या दिवशी हे दोन दात तुटले, पाहिलंत..."

तिनं तोंड उघडून दाखवलं – शुभ्र दंतपंक्तीत मध्येच फट !

" सुहरा !"

" अं !"

" बरं, मग पुढं ?"

" तिथं गेल्यापासून एक दिवस कधी पोटभर जेवायला मिळालं नाही, की एक दिवस कधी जिवाला शांतता लाभली नाही. मी बायको नव्हे, फक्त मोलकरीण आहे. घरात मरमर कष्ट उपसणारी–रात्रंदिवस फुकट राबणारी. नारळाच्या सोंड्या कुटून मिळणारी मजुरी घरात द्यावी लागते मला. मजुरी कमी मिळाली की मारहाण करतात. मला काहीही देत नाहीत. साधी गोष्ट मी बाहेरची होते..."

"...हूं...!"

" लागोपाठ चार दिवस..."

" हं...?" उपाशी रहावं लागलं मला !"

अशा प्रकारे सुहरा सारं काही सांगायला लागली. सांगण्याजोगं खूप कितीतरी होतं. तिच्या काळजात किती तरी रहस्यं दडलेली होती. ती म्हणाली, " अनेक वेळा वाटलं असं जगण्यापेक्षा सरळ मरून जावं. पण एकाच आशेवर जीव धरून राहिले... एकदा येईन, डोळे भरून पाहीन अन मग सुखानं प्राण सोडीन !"

" मृत्यूचा विचार करून मनाला निष्कारण क्लेश देण्यात काय अर्थ आहे! अजून खूप आयुष्य बाकी आहे. विश्वास ठेव. एक सुंदर भविष्यकाळ समोर उभा आहे."

मजीदच्या या बोलण्यावर सुहरा एक प्रदीर्घ निःश्वास टाकून स्तब्ध बसली. ती खुर्चीच्या समोर मजीदच्या पायाशी बसली होती. कितीतरी वेळ ते गप्प होते, चंद्र-प्रकाशानं न्हाऊन निघालेला तो आसमंत मूक मनानं पहात होते...अखेर मजीदनं त्या स्तब्धतेचा भंग करीत म्हटलं,-" सुहरा, जा जाऊन दोन घास खाऊन घे. निश्चिंत मनानं झोप. उद्या पुन्हा भेटू..."

" माझ्याच्यानं आता काही होत नाही –" असं म्हणत सुहरा जाण्यासाठी उठून उभी राहिली.

" इतकी अशक्तता ?" मजीदनं उठता उठता विचारलं.

" मन विषण्ण आहे !"

" उगीच मन कडू करून घेऊ नकोस. जा शांत झोप – थोडी विश्रांती घे. आराम कर."

" उद्या कुठं जाणार का आहात ?"

" नाही."

" सकाळी येईन मी." सुहरानं जाण्यासाठी पाऊल उचललं.

" हं ..." असं म्हणत मजीदनं सम्मतिदर्शक मान हलवली.

चंद्रप्रकाशात न्हाऊन निघालेल्या नारळीखालून सुहरा जात होती, पुसट होत जाणारी तिची पाठमोरी आकृती नजरेत साठवीत मजीद पुन्हा आरामखुर्चीत विसावला.

हातात मिणमिणती चिमणी वागवीत अम्मी तिथं आली. त्याला असा श्रान्त क्लान्त पडलेला पाहून प्रेमार्द्र स्वरात तिनं त्याला विचारलं, " बेटा, असा का पडलायस तू ?"

" कुठं-काही नाही. आपला उगाच ..."

" बेटा ! बघितलीस त्या सुहराची काय अवस्था झालीय ते ? कशी पोपटासारखी पोरगी होती... सारी अल्लाची मर्जी. दुसरं काय ! "

मजीदच्या काळजात दुःख आणि संताप एकाच वेळी दाटून आला. " कोणी केली तिची ही अशी अवस्था ? "

" बेटा, ये जरा दोन घास खाऊन घे. उगाच विचार कर करून डोक्याला ताप करून घेण्यात काय अर्थ आहे ? अल्ला सारं काही ठीक करील... "

मजीद त्या रात्री झोपला नाही. सुहराचाही रात्रभर डोळ्याला डोळा लागला नाही. त्यांच्यामध्ये जमीन आणि झरे आहेत. दोन प्रचंड भिंतीही उभ्या आहेत. पण तरीही ते दोघे झोपू शकले नाहीत. भविष्यकाळाचा विचार करीत राहिले.

" भविष्य काळ ! "

# १०

सुहराच्या मन:स्थितीत झपाट्याने बदल घडून आला. अंतर्यामी एक नवा प्रकाश, गालावर लाली आणि डोळ्यात एक आगळे तेज, एक अनोखी चमक ! केसांचा सरळ मधोमध भांग काढून ती ते पाठीमागे मोठ्या आकर्षक पद्धतीने बांधायची. शेजारपाजारच्या बायका आश्चर्यमिश्रित स्वरात म्हणायच्या, " सुहरा आली तेव्हापेक्षा आता खूप सुधारलीय. खूप चांगला फरक पडलाय तिच्यात, परत जाईल तेव्हा तिचा नवरा ओळखणार नाही तिला.

नवरा !

ती नेहमी मजीदच्याच घरी असायची. झाडाझुडांना पाणी घालण्याकडे तीही लक्ष द्यायची. मजीदच्या बहिणी म्हणायच्या – ही सारी झाडं आम्हीच लावली, पाणी घालून वाढवली.

सुहरा त्या जास्वंदीच्या झाडाविषयी विचारायची – " हेसुद्धा ? "

" ते तर आधीपासूनच इथं होतं. "

सुहरा त्या बाबतीत कसला काही वाद घालीत नसे. सारं काही आधीपासूनच तिथं होतं !

एक दिवस मजीदनं तिला विचारलं, – " सुहरा, कधी जाणार आहेस परत ? "

त्याच्या प्रश्नाचा रोख तिच्या ध्यानी आला नाही. गोंधळून तिनं विचारलं – " कुठं ? "

" आपल्या नवऱ्याकडं ? "

" ओह ! " तिचं तोंड खर्रकन् उतरलं. " त्यांनी लग्न काही माझ्याशी नव्हतं लावलं...... "

" तर मग कुणाशी ? "

" मी बरोबर नेले होते त्या सोन्याच्या दागिन्यांशी अन माझ्या वाटच्या इस्टेटीशी लावलं होतं त्यांनी लग्न. दागिने त्यांनी विकून खाल्लेत – उरला इस्टेटीतला माझा हिस्सा – तो मिळायचा काही मार्ग नाही याची पूर्ण कल्पना आहे त्यांना. " सुहरानं उत्तर दिलं.

मग क्षणभरानं तिनं आपल्या बोलण्याला पुस्ती जोडीत म्हटलं, " पण मी जर लोकांना डोळ्यांसमोर नकोशी झाली असेन....... तर जाईनही बापडी परत. "

" असं लोकांना वाटतं ? "

" वाटतं तर खरं – " तिनं एक गुलाबाचं फुल तोडून त्याचा वास घेतला, अन मग हलकेच आपल्या केसात खोवलं.

मजीदनं मध्येच तिला अडवीत म्हटलं, – " ते जास्वंदीचं झाड पूर्वीपेक्षा अधिक चांगलं दिसतं. "

ते ऐकलं अन सुहराला खुदकन हसू आलं. पण क्षणभरातच तिची मुद्रा विषण्णतेनं झाकाळली गेली. थोडं थांबून तिनं विचारलं, – " हे जास्वंदीचं झाड आठवतं?"

मजीदनं उत्तर दिलं – " हां ऐकलंय खरं थोडं त्याच्याविषयी ! "

" तर मग ' जरा मोठ्ठा एक ' विषयीही ऐकलं असणार ? "

" हो एकलं होतं ! शाहजादीच्या तोंडूनच ऐकलं होतं."

मनानं ते आता परस्परांच्या खूपच जवळ आले होते. मध्यंतरीचा दुरावा नष्ट झाला होता. आणि तरीही मजीदनं गाव सोडल्यापासूनच्या सात वर्षांत काय काय केलं याची तिला काहीच कल्पना नव्हती. हे रहस्य उलगडावं, त्या काळात जे जे काही घडलं ते सारं सारं जाणून, समजून घ्यावं अशी उत्सुकता तिच्या मनाला लागली होती. त्याच्या सहवासात आलेल्या स्त्री-पुरुषांविषयीही तिला जाणून

घ्यायचं होतं. स्त्रियांचा विषय निघाला की सुहरा विचारी – " काय वय होतं तिचं ? कशी होती दिसायला ? सुंदर होती ? तिची वेळोवेळी आठवण वगैरे येते का ?"

मजीद तिच्या साऱ्या प्रश्नांना संगतवार उत्तर देई, अन तरीही तिचं समाधान होत नसे. आपल्यापासून यानं काही दडवून तर ठेवलं नाही ? अशी शंका तिच्या मनात पुनःपुन्हा डोकावे.

" मला...... मला खरं तेच सांगायचं हं, ऐकलंत ? "

मजीद यावर हसून म्हणे – " काय पोरगी आहे ही ? "

" पोरा ! " ती भुवया ताणून, बोचकारण्याच्या आविर्भावात त्याच्या दिशेनं झेप घ्यायची अन स्वतःशीच खळाळून हसायची. कुंदकळ्यांसारख्या पांढऱ्या शुभ्र दंत-पंक्तीतली ती फट ! ती ओबडधोबड नखं ! बोचकारण्याचा तो जुना आविर्भाव ! आपल्या काळजात कोणी तीक्ष्ण सुरी फिरवीत आहे असा भास मजीदला अशा वेळी होई.

" मजीद अन सुहर यांच्यामध्ये एवढं हे कसलं काय रहस्य आहे ? " शेजाऱ्या-पाजाऱ्यांची जिज्ञासा जागृत झाली.

" ही पोरगी आपल्या नवऱ्याकडं परत का नाही जात नांदायला ? काहीही असो, अल्लाला आवडेल हे ? "

" मजीद अन सुहरा एकमेकांशी अशा गप्पागोष्टी करतात हे सदाचाराला सोडून होतंय ? आभाळ कोसळून नाही पडणार ? तिच्या नवऱ्यानं एक लाथ मारली तर काय बिघडलं त्यात ? भले एक वेळ मारल्यानं दात पडले असतील, काही झालं तरी अखेर नवराच आहे ना तो तिचा ? "

" सुहरा ! " एक दिवस मजीदनं म्हटलं, " शेजाऱ्या पाजाऱ्यात तुझ्यामाझ्या-विषयी बरीच चर्चा चालू असते आजकाल. "

सुहरानं विचारलं, " बरं मग ? "

" काही नाही, सुहरानं यावरून बोध घ्यायला हवा – सावध व्हायला हवं – बाईची जात – नावाला काळीमा लागता कामा नये – "

" लागेना काळीमा ! माझ्या जिवालाच लागेल – दुसऱ्या कुणाला तर नाही ?

तिचे डोळे भरून आले. काहीतरी सांगायसाठी मजीद उत्सुक झाला होता. सुहराच्या बाबतीत काही एक ठरवलंय पण सांगायचं कसं ? सुहराला देण्यासाठी जवळ काय आहे ? घरदार नाही, पैसा अडका नाही, काही नाही! त्यानं म्हटलं– " सुहरा ! सासरी नाही जायचं ? "

" नाही..... "

मजीदनं आईकडे विषय काढला. कितीतरी वेळ तिनं काहीच उत्तर दिलं नाही, अखेर म्हणाली, " तू सुहराशी लग्न केलंस तर चांगलंच आहे – पण तुझ्या दोन बहिणी अजून लग्नाच्या राहिल्यात ना ? आपल्याकडं पैसा उरला नाही. तरीही इज्जत-आबरू ही सांभळलीच पाहिजेत आपण. बेटा, तू कुठून तरी या पोरींसाठी चांगलीशी स्थळं शोध. थोडंबहुत सोनंनाणं गाठी जोड – हुंड्यासाठीही पैशा-अडक्याची तरतूद करावी लागेल..... ती कर. ह्या दोन्ही पोरी व्यवस्थित उजवल्या गेल्या की तू खुशाल लग्न कर, बेटा ! "

केवळ चांगले उपवधू तरुण शोधणंच पुरेसं नाहीय. सोन्याचे दागिने अन हुंड्या-साठी पैसाही हवा.

मजीदनं विचारलं, " हुंड्यावाचून नाही का कुणी लग्नाला तयार होणार ? "

" कोण तयार होईल असं बिनहुंड्याचं लग्न करायला, पोरा ! एखादा कामगार, मजूर अथवा ख्रिस्ती धर्मात गेलेला कुणी मिळेल हुंड्यावाचून लग्न करायला. हे कसं शक्य आहे आपल्याला ...... ? अन कमीत कमी म्हटलं तरी कानांतले, गळ्या-तले अन कमरेसाठी तरी सोन्याचे दागिने करावेच लागतील ! हो की नाही ? "

मजीदच्या बहिणींच्या चारही कानांना मिळून बेचाळीस छिद्रं आहेत. एवढी सारी भोकं काय म्हणून पाडली ? गळ्यात, कमरेत नाही घातले सोन्याचे दागिने तर काय बिघडेल ? ही दहेजची–हुंड्याची प्रथा नसती तर...?

" अम्मीजान ! हे कानांना भोकं पाडणं वगैरे प्रथा नसती तर किती चांगलं झालं असतं. आपल्याच समाजात ही अशा तऱ्हेची निरर्थक पद्धत का म्हणून आहे ? घाणेरड्या पद्धती अन तऱ्हेवाईक कपडे. तऱ्हेवाईक पद्धतीचे दागिने. "

अम्मी आणि अब्बा यावर काही एक बोलले नाहीत. त्या बिचाऱ्या म्हाताऱ्यांना दोष देण्यात काय अर्थ आहे ? आपापल्या पिढीच्या आचारपद्धतीनुसार ते वागले. अमुक एक गोष्ट आवश्यक आहे की अनावश्यक याच्या फालतू विचारात ते नाही पडले. जुन्या रीति-रिवाजांपासून काडीमात्र हटायचे नाहीत ते मागे – पण अशा तऱ्हेनं वागण्यासवरण्यासारखी आज आता परिस्थिती उरलीय काय ?

मजीदचा रात्र रात्र डोळा लागत नसे. नेहमी काळजीत बुडालेला असायचा. बहि-णींची लग्नं करायचीत. त्या तारुण्याच्या ऐन बहरात आहेत. त्यांच्या अशा अपेक्षाही खूप मोठमोठ्या आहेत. पण अंगभर ल्यायला धड वस्त्र नाही. खाण्यापिण्याचेही... मोहाचे दुर्बल क्षण अनेक असतात. जरा कुठं पाऊल चुकून वाकडं पडलं तर... !

त्याच्या मनाची अस्वस्थता वाढत गेली. खूप काही करावं असं त्याला मनोमन वाटत होतं. घरावरचं कर्ज फेडायचंय. बहिणींची लग्नं करायचीत. आई-वडिलांना बरं वाटेल, आनंद वाटेल अशा कितीतरी गोष्टी करायच्यात. ते थकलेत... म्हातारे झालेत. मृत्यू त्यांच्यावर कधी झाप घालील याची शाश्वती नाही. त्यांचे उरलेले आयुष्य सुखात आनंदात जाईल ह्यासाठी धडपडलं पाहिजे.

सुहराबरोबर लग्न करायचंय. तिच्याही बहिणी आहेत, आई आहे. त्यांच्यासाठीही काहीतरी करायला हवं. पण करणार काय? ह्या साऱ्यांसाठी आवश्यक गोष्ट म्हणजे पैसा. कुठलंही काम एकदा सुरू केलं की ते कसंही करून चालू ठेवता येतं. परंतु अडचण आहे ती मुळात सुरू करण्याचीच. हातात पैसे असल्याखेरीज अन कुणीतरी मदत केल्यावाचून ह्या जगात आजवर कुणीही काहीही करू शकला नाही.

पण अम्मीचं मत ह्याहून भिन्न आहे. ती म्हणते, दूर-दूरच्या शहरात उदार अंतःकरणाचे मुसलमान आहेत. समाजोन्नतीसाठी ते खूप काही करीत असतात. अनाथ पोरींची लग्नं लावून देणं, बेकारांना कामधंद्याला लावणं, मोफत शिक्षण देणाऱ्या शाळा चालविणं, दीन-दुबळ्यांसाठी; अपंगांसाठी अनाथालयं स्थापन करणं – अशी दानधर्माची खूप कामं ही मंडळी करीत असतात.

"बेटा! आमची हकीगत त्यांच्या कानी जाण्याचाच काय तो अवकाश – बाकी सारं काही ते करतील. मला नक्की माहीत आहे. त्या फकिरानं सारं काही सांगितलं होतं."

कोणा एका भिकाऱ्यानं तिला सांगितलं होतं की दूर देशात राहणारी धनिक मंडळी मोठी उदार आहेत. दातृत्ववान आहेत.

शंकित मनानं मजीद जायला तयार झाला. कुठंही जाऊन काही काम करीन. त्यानं सुहराला सारं काही समजावून सांगितलं – म्हणाला, "मी जाऊन लगेच परत येईन. सर्वांना मी तुझ्यावर सोपवून जातोय –"

एके दिवशी सायंकाळी पश्चिम क्षितिजावर सोनेरी ढग झगमगत होते – अशा वेळी मजीदची पेटी आणि वळकटी डोक्यावर घेतलेला एक मुलगा बस स्टॅन्डच्या दिशेनं मार्ग आक्रमण करीत होता. मजीदनं सर्वांचा निरोप घेतला.

अब्बा म्हणाले, "मला आता डोळ्यांनी नीटसं दिसत नाही. येताना एखादा चष्मा आण माझ्यासाठी. आणशील? की नाही..."

"आणीन हो –" असं म्हणत मजीद आपल्या खोलीत गेला. तिथे खिडकीशी साश्रुनयनांनी सुहरा उभी होती.

" एक गोष्ट सांगू का... ?" तिनं विचारलं.

मजीद हसला – म्हणाला, " बोल शाहजादी... "

ती काही सांगायला लागली – पण तेवढ्यात बसचा आवाज कानांवर आला. तिचं सांगणंही अर्धवटच राहिलं.

अम्मी खोलीच्या उंबरठ्याशी थबकत म्हणाली, " घाई कर बेटा ! बस सुटेल एखादवेळी... "

मजीद जायला निघाला तशी सुहराच्या डोळ्यांना आसवांची धार लागली. त्यानं तिचा निरोप घेत म्हटलं, " येऊ मी आता ?"

सुहरानं मानेनंच त्याला संमती दिली.

एका अज्ञात भवितव्याच्या दिशेनं मजीदनं पावलं उचलली. दाराशी येताच त्यानं जरा वळून मागं पाहिलं. त्या क्षणी सुहराचं अन त्या घराचं जे चित्र त्याच्या दृष्टीला पडलं ते कायमचं त्याच्या हृदयावर कोरलं गेलं. काही महिन्यांनी ते दृश्य त्याच्या डोळ्यांसमोर पुन्हा जसंच्या तसं उभं राहिलं. पण कोणत्या परिस्थितीत !

## ११

सुहराशी लग्न करायचंय, त्याच्या आधी बहिणींसाठी चांगली स्थळं शोधायचीत, हुंडा अन दागिने देण्यासाठी पैसा कमवायचाय ह्या सर्वांवर उपाय ? ... नोकरी हवीय; पण... मजीदच्या पदरी पडली ती फक्त निराशा. नोकरी कुठंही उपलब्ध नाही अन यदाकदाचित कुठं आढळलीच तर त्यासाठी कोणीतरी चांगली शिफारस करणारा, शब्द टाकणारा, हमी घेणारा अत्यावश्यक आहे. खेरीज परीक्षा पास झाल्याचं प्रमाणपत्रही हवंच. हे सारं पाठीशी असल्याखेरीज नोकरी मिळणं कठीण. तरीही नोकरीच्या शोधात तो वणवण भटकला– कित्येक शहरं नोकरी धुंडाळीत त्यानं अक्षरशः पालथी घातली.

असं करता करता अखेर तो आपल्या जन्मगावापासून दूर पंधराशे मैलांवरच्या

एका प्रचंड शहरात येऊन ठेपला. दरम्यान चार महिन्यांचा काळ कालावधीत गडप झाला होता.

ह्या शहरात त्याला एक नोकरी मिळाली. नोकरी तशी काही फार कटकटीची नव्हती. प्राप्तीही चांगली होती. फक्त अविश्रांत काम करावे लागत होते. शेकडा चाळीस कमिशन. खुद्द कंपनीच्या मालकानंच ते कबूल केलं होतं.

फिरायला कंपनीची सायकल होती. मालाचे नमुने घेऊन आख्खा वेळ शहरभर भ्रमंती करावी लागायची. राहाण्यासाठी कंपनीतच जागा मिळाली होती.

अशा प्रकारे मजीदनं स्वतःला कामाला जुंपून घेतलं. एका छोटयाशा पेटीत मालाचे नमुने व्यवस्थित घालून अन ऑर्डरबुक घेऊन तो सायकलवर टांग टाकायचा. आख्खं शहर भटकून ऑर्डर्स मिळवायचा अन तृप्त मनानं परतायचा.

हां हां म्हणता एक महिना उलटला. सारा खर्च वजा करून उरलेल्या रक्कमेतनं त्यानं घरी शंभराची मनिऑर्डर केली. वडिलांसाठी एक चष्मा आणि सुहरा वगैरे सर्वांच्या कापडाचोपडासाठीही पैसे धाडले.

आणखी एक महिना गेला. पुढच्या क्षणी काय होणार आहे, याची कोणाला काही कल्पना थोडीच असते ? उद्या आपलं काही वाईट होणार आहे याची कोणी वाट का पहात असतं ? आणि मजीदच्या तर काही म्हणता काहीही ध्यानी-मनी नव्हतं. अशातच अगदी अकल्पितपणे तो अपघात झाला.

सोमवार होता तो. मजीदला पक्कं आठवतं–दुपारची वेळ होती ती ! नित्याप्रमाणं सॅम्पलची पेटी सायकलच्या दिव्याच्या जागी नीट लटकावून समुद्राच्या कडेकडेनं गेलेल्या डांबरी सडकेकरून तो सायकल पिटाळीत होता. वाटेत एका जागी मोठा उतार होता. या उताराशी येताच सायकलनं वेग घेतला आणि काय होतंय ते ते समजण्याच्या आत सॅम्पलबॉक्सचं हॅन्डल तुटलं अन पेटी सायकलच्या पुढच्या चाकात फसून बसली. मजीद थाडकन सायकलवरून दूर भिरकावला गेला अन धाडकन एका खोल खड्डयात जाऊन पडला.

आपल्या अंगावर जणू एखाद्या प्रचंड पर्वताचा कडाच कोसळून पडला आहे असा क्षणमात्र त्याला भास झाला अन त्यासरशी शरीरात कशाचा तरी चक्काचूर झालाय काहीतरी तुटून दूर फेकलं गेलंय, देहापासून विलग झालय याची प्राणांतिक वेदनांनी त्याला तत्काळ जाणीव करून दिली. त्याच्या डोळ्यांपुढे दशदिशांतून काळोख घोंगावत आला आणि विस्मृतीच्या मिट्ट काळोख्या भयानक गर्तेत तो पाहता पाहता घरंगळत गेला. एखाद्या वादळी रात्री आकाशात विजा कडाडाव्यात,

त्यांच्या प्रकाशानं आसमंत पळभर उजळून निघावं तशी मधूनच कधीतरी त्याची स्मृती जागी होई. भयंकर यातना. औषधांचा उग्र गंध. कण्हण्याचा आवाज. तोंडातून गळ्यातनं काहीतरी लांबलचक असं खाली खाली उतरतंय...गरम पाण्या-सारख्या कसल्यातरी गोष्टीनं पोट व्यापलं जातंय—कसला तरी...कशाचा तरी स्पर्श अस्पष्टसा जाणवून जातोय...अशाच प्रकारच्या अनुभतीत दिवसांमागून दिवस मागे पडताहेत.

काही आठवत नाही. डोळ्यांसमोर काहीही स्पष्ट येत नाही. वाऱ्यावर आरूढ झालेल्या पांढऱ्या शुभ्र धुराच्या लोटाप्रमाणे, चंदेरी ढगांप्रमाणे, मजीदची स्मृती विरळ होत होत त्याच्यापासून दूरदूर जातं आहे...सारं विस्मृतीच्या खोल गर्तेत विलीन पावणार आहे का ? नष्ट होणार आहे का ?

नाही. जगायचंय आयुष्य? तीव्र. कठोर वेदना! मरणप्राय दुःख! तरीही जगाय-चंय...जगलं पाहिजे...जगायलाच हवं ! मजीदनं जिवाच्या आकांतानं प्रयत्न केला. जणू पंचप्राण गोळा करून, साऱ्या चिच्छक्ती एकवटून त्यानं स्वतःच्या मनावर कोसळलेला तो विस्मृतीचा प्रचंड पर्वत झुगारून दिला...हलके हलके यातनांच्या जोडीनं हरपलेली शुद्ध बुद्ध परत यायला लागली.

त्यानं एक प्रदीर्घ निःश्वास टाकला. हलके हलके डोळे उघडले. बिछान्यावर सरळ पसरलो आहोत. गळ्यापर्यंत पांढरी शुभ्र चादर अंगावर घातली गेली आहे. हॉस्पिटल ! त्याला सारं काही आठवलं.

भयानक वेदना. डाव्या बाजूला कमरेच्या खाली यातनांचा जणू आगडोंब उसळतोय ! डोक्यात असह्य वेदना होताहेत ! त्यानं हात फिरवून पाहिलं. कमरेभोवती खूप कापड गुंडाळलंय. तो आपला डावा पाय शोधू लागला. निर्जीव हाडांच्या सापळ्यागत सारं काही थंडगार ! शून्य !

तो भयंकर घाबरला. घामानं डबडबून निघाला. पुन्हा शुद्ध आली. एका पायाचा अर्धा भाग कायमचा नष्ट झाल्याचं त्याला जाणवलं. भोवतीचं विश्व गरागरा फिरतंय ? आवर्तात सापडून खोल एखाद्या गर्तेत खाली खाली जात आहोत असा त्याला भास झाला !

खात्री करावी म्हणून त्यानं पुन्हा एकवार त्या जागी हात फिरवून नीट चाचपून काही पाहिलं. हाताला लागलं नाही. फक्त असह्य वेदना. सुहराच्या पहिल्या चुंबनाचं भाग्य प्राप्त झालेला तो डावा पाय...काय झालंय त्याचं ? कुठं गेलाय तो ?

डोळे उघडेच होते. कढत कढत आसवांनी दोन्ही गाल ओले चिंब करून टाकले

तरी त्यांना खंड नव्हता. कंपनीच्या व्यवस्थापकानं त्याच्यावर हलकेच ओणवं होत म्हटलं, " मिस्टर मजीद ! मला फार फार वाईट वाटतं. आपण कष्टी होऊ नका. मन खट्टू करून घेऊ नका...धीर धरा... वाईट वाटून घेऊ नका...मला खरोखरच फार खेद होतोय ह्या साऱ्याचा ! "

"सुहरा !"

" काय मजीद ?"

" तू हूं का नाही म्हणत ?"

" मी हूं म्हणतयेय न ? अन मुला, मला 'तू' म्हणून का संबोधतोस ?"

मजीदची भीतीनं गाळण उडाली–' सुहरा ' असं जोरानं हाक मारीत तो चमकून जागा झाला.

" दिवसाढवळ्या स्वप्न का पडलंय ?" नर्सनं विचारलं.

मजीद केविलवाणं हसला.

चौसष्ट दिवस आणि चौसष्ट रात्री व्यतीत झाल्या. आपल्याहूनही उंच अशा एका काठीच्या आधारानं कंपनीच्या मॅनेजरबरोबर तो हॉस्पिटलचं फाटक ओलांडून हमरस्त्यावर आला. वाहत्या गर्दीतनं मार्ग काढू लागला.

मजीदच्या हातात पन्नास रुपयांच्या नोटा ठेवीत कंपनीच्या मॅनेजरनं म्हटलं– " आता आपण गावी आपल्या घरी परत जा. हे सारं असं घडावं याचा मलाही विलक्षण खेद होतोय बघा...!"

मजीदच्या डोळ्यांतून आसवं ओघळू लागली. म्हणाला, " माझ्या बहिणींची लग्नाची वयं कधीच उलटलीत–बिचाऱ्या घरीच बसून आहेत. आईवडील वयानं पार थकलेत. सारी शेतीवाडी कर्जाखाली सावकाराच्या घशात अडकून पडलीय. साऱ्या घरात कर्ता-सवर्ता पुरुष काय तो मी एकटाच. घरातल्या अडीअडचणींचं पूर्ण निवारण झाल्याखेरीज घरी परतायला मन होत नाही अन ह्या अशा अवस्थेत घरी परतून त्यांच्या आधीच्याच अडचणीत मी भर तरी कशी काय टाकू ?"

"तर मग काय करायचा विचार आहे आपला आता ? "

" मनाचा अजून कसलाच काही एक निश्चय होत नाही. काय करावं काही उमगत नाही. "

" माझ्या कंपनीत आपल्याला झेपेल असं काही काम ... आपल्याला जमाखर्च लिहिणं जमेल ? "

" नाही. हिशोब-ठिशोबाच्या कामात मी फार कच्चा आहे. "

अशा प्रकारे मजीद पुन्हा एकाकी पडला. त्यानं चाळीस रुपये घरी धाडले. सोबत एक पत्रही पाठविलं ... त्यात अपघातात एक पाय गमावला वगैरे कसली काही हकीगत लिहिली नाही. फक्त आपण बरेच दिवस आजारी होतो येवढंच कळवलं. आणखी एक कळविलं की आपलं पुन्हा पत्र येईपर्यंत उत्तर पाठवू नये.

दुसरी कुठं नोकरी मिळतेय की काय याच्या शोधात त्याची भ्रमंती सुरू झाली. दोन्ही हातानं काठी घट्ट पकडून एका पायावर सारा भार टाकीत चार दोन पावलं रखडत – थोडं थांबत – थांबून थोडा विचार करीत. पुन्हा चार पावलं पुढं सरकत त्याची भ्रमंती चालायची. अशा प्रकारे दोन महिने गेले. राहायला कुठं जागा नाही. जिथं कुठं रात्र पडेल तिथंच जमेल तसं रात्रीपुरतं अंग टाकायचा.

शेवटी शहारातल्या श्रीमंत लोकांना भेटून मदतीची याचना करायचं त्यानं ठरवून टाकलं. तपास केल्यानंतर एका खानबहादुरांविषयी समजलं – की गृहस्थ मोठ्या उदार अंत:करणाचे आहेत. दयाळू आहेत. शहरातल्या कितीतरी मोठमोठ्या हवेल्या त्यांच्याच मालकीच्या आहेत. लोकांचं म्हणणं असं की त्यांच्या घराची वळदं अगदी ठासून सोन्याच्या विटांनी भरलीयत ! सरकारदरबारीही त्यांचं खूप वजन आहे. अलीकडेच त्यांनी चांगले दहा पंधरा हजार रुपये खर्चून गव्हर्नर साहेबांना जंगी मेजवानी दिली होती. ते काय वाटेल ते करू शकतात ... अगदी काहीही !

परंतु दरवानानं मजीदला दाराच्या आत पाऊल टाकू दिलं नाही. रोज तो त्यांच्या त्या भव्य प्रासादाच्या दरवाजाशी जाऊन उभा राहायचा. अशा प्रकारे आठ दिवस गेले. अखेर दरवानालाच त्याची दया आली. खानबहादुरांच्या भेटीसाठी मजीदला प्रवेश मिळाला.

मजीदने सलाम केला एक मुसलमान दुसऱ्या मुसलमानाला भेटला म्हणजे त्यानं सलाम आले कुं असं म्हणायला पाहिजे; पण का कोण जाणे, खानबहादुरांनी त्याच्या त्या सलामाला प्रतिसाद दिला नाही. इतकंच काय पण साधं ऐकल्याचा भावही त्यांनी स्वत:च्या मुद्रेवर प्रकट होऊ दिला नाही. ते पन्नाशीच्या जवळपास आलेले गोरेपान, डौलदार बांध्याचे गृहस्थ होते. हिरेजडित अंगठीच्या झगमगाटात आपली दाढी कुरवाळीत त्यांनी मजीदची सारी दु:खगाथा शांतपणे ऐकून घेतली अन अखेर म्हणाले, " आपल्या समाजात अशा कितीतरी स्त्रिया आहेत, की ज्यांचं लग्न होऊ शकत नाही. असे कितीतरी लोक आहेत, की ज्यांच्या नशिबी धड एक वेळचं जेवणदेखील नसतं. माझ्याच्यानं जेवढं होईल, तेवढं साऱ्यांसाठी मी करतोच आहे. सांगा, याच्यापेक्षा अधिक मी काय करू ? "

मजीद यावर काहीच बोलला नाही.

खानबहादुरांनी समाजोन्नतीसाठी जे जे काही केलं होतं, त्या साऱ्या महान कार्याचा पाढा वाचला. जिथं दुसऱ्या करोडपतींनी फक्त एक एक मशीद बांधली तिथं त्यांनी चार मशिदी उभ्या केल्या. आणखी म्हणजे एक शाळा उभारण्यासाठी त्यांनी आपल्या मालकीची जमीन देणगीदाखल दिली. आता त्याच जागेवर चाळी वगैरे बांधून त्या भाड्यानं दिल्या असत्या तर दरमहा केवढं उत्पन्न आलं असतं ? आपल्या समाजासाठी दरवर्षी किती रुपयांचं नुकसान ते असं सोसताहेत ! मग ते म्हणाले – " यापेक्षा अधिक मी काय करायला हवं, ते सांगा ! "

मजीद गुपचूप उभा राहिला.

अपघातात मजीदला आपला पाय गमावून बसावं लागलं त्याबद्दल त्यांनी दुःखही व्यक्त केलं. म्हणाले, " हा सारा आपल्या नशिबाचा भोग म्हणायचं झालं ! दुसरं काय ? "

तरीही मजीद काही बोलला नाही.

खिन्न मनानं खानबहादुरांचा निरोप घेऊन आपल्या काठीच्या आधारे लंगडत लंगडत तो जायला निघाला. तो उंबरठ्याशी पोहचला असेल नसेल तोच खान-बहादुरांचा एक नोकर त्यांनी दिलेला रुपया त्याला देण्यासाठी त्याच्या पाठोपाठ तिथं आला.

" मला दिलास असं सांग – अन ठेव तो रुपया तुलाच ... " असं नोकराला सांगून मजीदनं झटक्यात उंबरठा ओलांडला.

त्यानं तो रुपया का बरं स्वीकारला नाही ? त्याला हे माहीत नव्हतं का की त्या करोडपतीकडं असे हजारो गरीब मदतीसाठी जात असतात अन त्या साऱ्यांना तो दानधर्म करीतही असतो. समजा तो स्वतःच असा करोडपती असता तर त्यानं काय केलं असतं ? जो कोणी पहिला याचक दारी येईल त्याला अर्धी संपत्ती दान म्हणून देऊन टाकली असती ? एक तांब्याच्या पैशापेक्षा अधिक काही दिलं असतं त्यानं ? खानबहादुरनं तर चांगला बंदा रुपया पाठवला होता. त्याचा स्वीकार करणं हे त्याचं कर्तव्य नव्हतं काय ? मजीद विचारात पार गढून गेला; पण त्या शहरात करोडपती असे फक्त पाचच होते – बाकी साडेसहा लाख लोक सर्वसामान्य आणि गरीब असेच होते.

पंख तुटलेल्या पक्ष्याप्रमाणं मजीद सुन्न होऊन स्तब्धपणे जागच्या जागी खिळून उभा राहिला.

मजीदच्या हातातली काठी खालनं चांगली चार बोटं झिजली होती. हाताच्या तळव्यांना चांगले जाडजूड घट्टे पडले होते. खाण्या-पिण्याच्या आबाळीनं, उपासमारीनं शरीर पार खंगलं होतं.

त्याला एक काम मिळालं–एका हॉटेलात...खरकटी भांडी घासायचं काम. सकाळी चार वाजताच उठून रात्री अकरापर्यंत मोरीवर नळाशी बसणं भाग पडायचं. एका मोठ्या टोपलीत खरकटी भांडी भरून त्याच्याजवळ आणून ठेवली जात. तो एक एक करून ती घासूनपुसून दुसऱ्या टोपलीत टाकायचा. टोपली भरली की कोणीतरी ती उचलून न्यायचं अन आणखी टोपलीभर खरकटी भांडी घासायला म्हणून त्याच्याकडं आणून द्यायचं. बस्स. पहाटेपासून मध्यरात्रीपर्यंत हे एकच एक काम यायचं त्याच्या वाट्याला. पण निदान त्यामुळं तो दोन वेळा पोटभर जेवू तरी शकत होता. दरमहा पाच एक रुपयांची मनिऑर्डर घरी पाठवू शकत होता.

घरून पहिलं पत्र आलं. सुहरा आजारी आहे. ती फार अशक्त झाली आहे. थोडा थोडा खोकला पण येत असतो. "आम्ही सर्व खुशाल आहोत. एकदा तरी दृष्टभेट व्हावी. दर्शन घडावं ह्यासाठी जीव कसा तळमळतोय..." आपलीच, सुहरा.

## १२

सुहराच्या भेटीसाठी मजीदचाही जीव तगमगत होता. पंधराशे मैल दूर राहूनही सुहराचं दर्शन त्याला घडत होतं, तिचं खोकणं त्याला ऐकू येत होतं...काहीबाही बोलून तो तिला दिलासा देत होता. तिची समजूत घालीत होता....तिचं मन शांत करीत होता.

"सुहरा ! कसं आहे आता तुझं ? छातीतलं दुखणं कमी आहे ना आता ?" असं म्हणून तो धुवून झालेल्या प्लेटस्‌कडं बघत बसायचा.

रात्री झोपायच्या वेळी तो सुहराला उद्देशून म्हणायचा– ' माझी लाडकी सुहरा ती, झोप आता अंमळ शांत ! झोप हं आता !" पण हे बोलत असताना त्याची

नजर मात्र स्थिरावलेली असायची आकाशाच्या निळ्याभोर चांदव्याला लटकलेल्या चमचमत्या चांदण्यांकडे.

काही दिवसांनी आणखी एक पत्र आलं. हस्ताक्षर सुहराचं नव्हतं. अम्मीनं कुणाकडून तरी लिहून घेतलं होतं ते पत्र. ते वाचताच मजीदला भास झाला–की शहरातली सारी गडबड, गोंधळ, धावपळ, नानाविध आवाज एकदम कमे शांत शांत झाले आहेत. सारं अविचल, नीरव, निस्तब्ध होऊन बसलंय.

" माझ्या लाडक्या बाळा मजीद, तुझ्या माहितीसाठी तुझी अम्मी हे दुःखद वृत्त तुला कळवीत आहे. परवा सकाळी आपल्या सुहराला देवाज्ञा झाली. तिच्याच घरी, माझ्या मांडीवर डोकं विसावलेल्या अवस्थेत. तिचा आम्हा सर्वांना कोण आधार होता! देवानं तोही हिरावून नेला. आमचा हा एकमात्र आधार गेला. आता एक अल्ला सोडता, तुझ्याखेरीज बाळा आम्हांला दुसरं कोण आहे ?

" बाळा, गेल्या महिन्याच्या ३० तारखेला सावकारांनी आपलं घर आणि जमीन कर्जापोटी कब्जात घेतली. घर ताबडतोब खाली करा–इथून जा असा एकसारखा लकडा त्यांनी आमच्यामागे लावलाय. ह्या दोन पोरी आणि तुझे आजारी अब्बा-जानना घेऊन मी आता जाऊ तरी कुठं ? कुठं जाऊ, बाळ ?

" बाळ, माझी झोप पार उडालीय आजकाल. गेल्या कित्येक दिवसांपासून रात्री विचारानं डोळ्याला डोळा लागत नाही. झोप कशी ती माहीत नाही. तुझ्या बहिणींच्या समवयस्क मुली आज तीन-तीन चार-चार मुलांच्या आया झाल्या आहेत. उद्या पोरींच्या हातून चुकून काही विपरीत घडलं तर...? इथल्या लोकांना जरासुद्धा कसली दयामाया नाही ! तुझ्या अब्बांनी आणि मी किती मिनतवाऱ्या केल्या, हातापाया पडून विनंत्या केल्या, पण हे लोक आम्ही जागा खाली करावी म्हणून जसे काही हात धुवून पाठीशी लागले आहेत. आपल्या समाजातली किती तरी श्रीमंत मंडळी तिथं असतील. जरा त्यांना सांगून विनवून पहा. ते ह्यातून काहीतरी मार्ग जरूर काढतील–मदत करतील.

" बाळा, सुहरा जोपर्यंत होती तोपर्यंत मला फार विश्वास होता. जवळजवळ दोन महिने झाले ती बिछान्याला अगदी खिळूनच होती. क्षय ! मरायच्या आधी तुझी आठवण काढली. तू आलास का म्हणून पुन्हापुन्हा विचारीत होती. सारी अल्लाची मर्जी दुसरं काय ! "

पत्र वाचून होताच सुहराचे ते रूप मूर्तिमंत त्याच्या डोळ्यांसमोर उभं राहिलं. एखाद्या निर्जन, निःस्तब्ध अथांग वाळवंटात एखादा दगडी पुतळा असावा तसा तो

अविचल बसून राहिला आणि सुहराच्या जीवनग्रंथातील अगदी आरंभापासून अखेरपर्यंतचं एक एक पान तो अंतर्यामी स्मरत राहिला. अखेरपर्यंत ? कुठं आहे अखेर ? कुठं आहे अंत ?

त्या दिवशी तो निरोप घेऊन जायला निघाला अन तेवढ्यात तिला काही आठवलं... बोलायसाठी तिनं तोंड उघडलं अन बसचा पोंगा वाजला. अम्मीजान तिथं आली आणि तिला जे काही सांगायचं होतं ते तसंच ओठातल्या ओठात अर्धवट राहून गेलं. घाईघाईनं पायऱ्या उतरून तो अंगणात आला— बाग ओलांडून दरवाजाशी येऊन ठेपला. उंबरठ्याशी किंचित घुटमळला – थबकून मागं वळून पाहिलं.

पश्चिम क्षितिजावर सोनेरी ढग चमकत होते. झाडंझुडपं, घरं-बागा सारं काही पिवळ्या धमक उन्हात सचैल न्हाऊन निघालं होतं.

दोन्ही बहिणी दाराआडून अर्धवट डोकावून पहात होत्या. अब्बा पडवीच्या भिंतीला ओठंगून उभे होते. अम्मी अंगणात होती. सुहरा त्या जास्वंदीला घट्ट बिलगून उभी होती. तिचे डोळे आसवांनी डबडबले होते.

जे सांगता सांगता सांगायचं तसंच राहून गेलं, ते तेव्हा तिच्या ओठांवरच रेंगाळत राहिलं असणार. सुहरा, काय सांगणार होतीस तू मला— जे सांगायचं तसंच अर्धवट राहून गेलं ?